# देशीयता : वास्तव आणि आभास

नेमाडेंनी 'अँग्लो -मराठी संपर्कातून जन्मलेल्या (त्यांच्या भाषेत लादलेल्या)आंतरराष्ट्रीयत्व ह्या संकल्पेनेविरुद्ध आपली देशीयता ही संकल्पना प्रतिष्ठित केली आहे. 'साहित्यातील देशीयता' ह्या टीकास्वयंवरामधील निबंधात त्यांची ही चर्चा आहे. मराठीत जे काही मूल्यवान लेख समीक्षेत लिहिले गेले त्यातील हा लेख महत्त्वाचा वळणटप्पा आहे. ह्या निबंधातील प्रत्येक परिच्छेदाची चिकित्सा करणे त्यामुळेच आवश्यक वाटते. नेमाडेंचा हा लेख म्हणजे ब्राह्मणी जाणिवेच्या खुराड्यात आंतरराष्ट्रीय अंडी उबवू पाहणाऱ्या सत्यकथेच्या कोंबड्यांना सणसणीत चपराक आहे. ज्यांना स्वतःच्या जातीच्या संस्कारातून बाहेर पडता येत नव्हते त्यांनी आंतरराष्ट्रीयवादाच्या गप्पा मारणे म्हणजे गल्लीतल्या मरतुकड्या धावपटूने ऑलिम्पिकमध्ये पन्नास ठिकाणी पन्नास वेळा धापा टाकत कसेबसे एक वर्षात मॅरेथॉन पूर्ण करून ऑलिम्पिकमध्ये पराक्रम गाजवल्याच्या हकीगती सांगण्यासारखे होते. नेमाडेंनी देशीयतेचा हा डोस १९६० साली द्यायला हवा होता म्हणजे त्याचा फायदा झाला असता. पण दुर्दैवाने नेमाडेंनी हा डोस सत्यकथा बंद पडल्यानंतर १९८३ साली दिला. ह्या अर्थाने नेमाडेंचा हा लेख म्हणजे रोगी मेल्यानंतर केलेली उपाययोजना होती. असो. आपल्याकडे सर्वच गोष्टी उशिरा होतात. विशेषतः आपली समीक्षा लेटलतीफ आहे. देशीयता आऊटडेटेड झालीय, ग्लोबलायझेशन येऊ घातलंय, आता आपले समीक्षक कीस पाडून पाडून देशीवादाची चर्चा करतील. त्याचे समर्थन करतील. (खरं तर ह्या प्रक्रियेला अविनाश सप्रे, उत्तम क्षीरसागर ह्या लोकांनी सुरुवात पण केलीय) आणि आमची पिढी मात्र साहित्यातून ग्लोबलायझेशनचे प्रश्न व जाणिवा मांडत राहील.

*'कोणत्याही साहित्यातून देशी जाणिवा स्वाभाविकतःच व्यक्त व्हाव्यात अशी अपेक्षा असते. तथापि युरोपी हिकमती लोकांच्या दीर्घकालीन दास्यत्वामुळे विसाव्या शतकाच्या मध्यावर जगातल्या विविध प्रदेशांमधील वसाहतींमध्ये एक खास वसाहतवादी आंतरराष्ट्रीयता निर्माण झाली. स्वातंत्र्योत्तर एकोणीसशे पन्नाशी आणि साठीच्या दशकांमधले कित्येक मराठी विद्वान आणि साहित्यिक अशा आंतरराष्ट्रीयत्वाने बेभान होऊन भरकटत गेलेले दिसतात. ह्या वृत्तीच्या लोकांना अनुरूप अशी राजकीय-सामाजिक परिस्थितीसुद्धा ह्या काळातल्या नेहरूयुगाच्या भोंगळ आंतरराष्ट्रीयत्वामुळे मिळत गेली. पिण्याचे पाणी मिळाले नाही तरी चालेल, पण रंगीत टीव्हीवर जगातल्या गंमती दिसल्या पाहिजेत. दूरदूरच्या उत्तमोत्तम खेळाडू होऊ शकणाऱ्या तरुण मुलामुलींना*

*रोज दूधसुद्धा न मिळाले तरी चालेल, पण दिल्लीत जोरात एशियाड भरवले पाहिजे, वगैरे गोष्टी ज्या काळात प्रतिष्ठित ठरल्या त्या काळात बिचाऱ्या संकुचित देशीपणाचे भान राखणे म्हणजे पुनरुज्जीवन किंवा राष्ट्रवादी ठरणे ओघानेच आले. हे विशाल आंतरराष्ट्रीयत्व जोपासण्यासाठी मुलांना मराठी आले नाही तरी चालेल, पण इंग्रजी माध्यमातून शिकविले पाहिजे हेही आपोआपच घडते. नंतर आपल्या विद्वानांनी ज्ञानदेव-तुकाराम नाही वाचले तरी विशेष बिघडत नाही, पण फालतू इंग्लिश-अमेरिकन लेखक सखोल अभ्यासले पाहिजेत अशा सवयी जडतात. कारण त्याशिवाय तुम्ही आंतरराष्ट्रीय विशाल जाणिवा कशा जोपासणार ?'*

श्री. पुं.च्या सत्यकथेचे आंतरराष्ट्रीयत्व वसाहतवादामुळे जन्मले असे नेमाडेंनी इथे सूचित केलेय. पण हे अर्धे सत्य आहे. फ्रॉईड व मार्क्सचा प्रसार जे देश वसाहतवादाचे बळी नव्हते त्याही देशात झाला. जपानपासून इंग्लंडपर्यंत मार्क्स व फ्रॉईड पसरले. तेव्हा त्यांनी वैश्य व दलित जाणिवेतून जन्मलेल्या प्रश्नांना उत्तरे सुचवली. मार्क्स जर्मन होता, फ्रॉईड हाही जर्मन होता, तरीही हे विचारवंत प्रथम युरोपात नंतर जगभर पसरले आणि सत्यकथेचा आंतरराष्ट्रीयवाद घडवण्याला त्यांनी मदत केली. तेव्हा ऊठसूठ वसाहतवादाला झोडपण्यात अर्थ नाही. ह्या गोष्टी वैश्य जाणिवेतून जन्मल्या आणि आधुनिक संस्कृतीत दळणवळणाची साधने प्रचंड विकसित झाल्याने त्या जगभर फोफावल्या. आज जपानीज मॅनेजमेंटची शैली अमेरिकेनेही वापरलेली दिसते. नेमाडे ह्याला जपानचा वसाहतवाद म्हणणार आहेत काय ? मी पूर्वीच म्हटल्याप्रमाणे नेमाडे हे क्षत्रिय जाणिवेत अडकल्यानेच त्यांना साध्या साध्या वैश्य जाणिवेच्या गोष्टी कळत नाहीत.. पिण्याचे पाणी, रंगीत टीव्ही, दूध आणि एशियाड ह्यावरचे नेमाडेंचे भाष्य हेही त्यांचा आर्थिक ज्ञानाबाबतचा दिवाळखोरपणा सिद्ध करते. त्यांची ही वाक्ये समाजवादी रंगमंचावर टाळी वसूल करायला ठीक आहेत. वास्तवतेशी त्यांचा संबंध नाही. पिण्याच्या पाण्याचा प्रश्न एका विशिष्ट तंत्राने व उत्पादनाने सुटतो, तर रंगीत टीव्हीचा एका विशिष्ट तंत्राने ! रंगीत टीव्ही निर्माण करायचा बंद केला म्हणून पाण्याचा पुरवठा वाढवण्याचे तंत्र विकसित होऊ शकत नाही. त्यासाठी ते स्वतंत्रपणे विकसित करावेच लागते. दुसरी गोष्ट इथे सांगितलीच पाहिजे; कारण इथले अडाणी लोक इथल्या टीव्हीवरच्या जाहिरातींविरुद्ध चंगळवाद म्हणून बोंब मारत आहेत. माझ्या मते टीव्ही गेली पंचवीस वर्षे बोंबा मारूनही जे तुम्ही करू शकला नाही ते लोकसंख्या नियंत्रणाचे काम करत आहे. टीव्ही आज लोकांच्यापुढे इतक्या नवीन नवीन चैनीच्या वस्तू मांडत आहे की, त्यांच्या गरजा इतक्या वाढवून ठेवत आहे की, लोकांना त्या गरजा भागवण्यासाठी कुटुंब लहान ठेवावे असे वाटत आहे. मी कित्येक मुसलमान कुटुंबातही अलीकडे झालेले हे परिवर्तन पाहतो आहे. टीव्ही,

फ्रीज वगैरे गोष्टी घ्यायच्या म्हटले तर जास्त पोरं काढून चालणार नाही हे सामान्य गृहस्थ गृहिणींनाही चटकन् समजते आहे आणि माझ्या मते पिण्याच्या पाण्याच्या प्रश्नाइतकाच हा प्रश्न महत्त्वाचा आहे. ह्याशिवाय विश्वाचे ज्ञान व कला तुमच्या दारात येते ते वेगळेच. एशियाडचे अर्थकारण वेगळे होते.आशियातील सर्व देशांचा पैसा ओढणे आणि इलेक्शनसाठी आवश्यक तो पैसा काढणे असा परमार्थ आणि स्वार्थ त्यात गुंतलेला होता. त्याचा आंतरराष्ट्रीय वसाहतवादाशी काहीही संबंध नव्हता. केवळ भारतच नव्हे तर जपाननेही एशियाड भरवले आहे. माध्यमाचा प्रश्न मी नंतर घेतो आहे. आपले लेखक ज्ञानदेव, तुकाराम वाचत नाहीत हा वसाहतवादाचा दोष नाही, तो आपल्या लेखकांचा आळशीपणा आहे. ऊठसूठ आपल्या आळशीपणाचे खापर बाहेरच्या अर्थकारण, समाजकारण ह्यावर फोडणे बरे नाही. ज्ञानेश्वर, तुकाराम न वाचणे व फालतू इंग्लिश, अमेरिकन लेखक वाचणे जितके वाईट तितकेच टॉलस्टॉय, काफ्का, कुन्देरा न वाचणे व फालतू मराठी, हिंदी देशी लेखक वाचणे वाईट आहे. तेव्हा विवेक महत्वाचा आहे. चांगले वाचणे महत्वाचे. देशी-विदेशी हा दुय्यम प्रश्न आहे. ह्यात फारतर देशी प्रथम, नंतर विदेशी असा क्रम लावता येईल.

*'ह्याच काळात युरोपात योगायोगाने आधुनिकतेचे मोठे वादळ उठून गेले. ह्या आधुनिकतावादी साहित्यिक विचारवंतांनी शुद्ध सौंदर्यवादी भूमिका सजवून सुंदर सुंदर कलाकृती मांडण्याचा ध्यास घेतला. रूपवाद, संरचनावाद, सौंदर्यशास्त्र, तत्वज्ञानातले अनेक बेफिकीर संप्रदाय, तौलनिक साहित्यविचार, प्रतीकवादासारखे तंत्रप्रधान सार्वत्रिक आढळणारे बाह्यवर्ती सिद्धांत, फ्रॉईड-मार्क्स वगैरेची अखिल मानवी नकाशाबद्दल बोलण्याची पद्धत, औद्योगिक-तंत्रविद्यापर-शास्त्रीय-सेक्युलर शैलींची जगभरची लोकप्रियता, ह्या सर्व गजबजाटात युरोपीय साहित्यिक विचारवंतांच्या लक्षात हे आलेच नाही की, प्रत्येक मानवी समूहाची आपली स्वतःची संस्कृती असते. पृथ्वीवरचा प्रत्येक समाज युरोपी असण्याची शक्यता अर्थातच नाही. जे काही युरोपीय साहित्यिक आपापल्या शोषक वसाहतवादी समाजातसुद्धा देशी भान राखून होते, त्यांनाही हा स्वतः आणि इतर ह्यामधला भेद जाणवला नाही. कारण त्यांचा देशीपणासुद्धा त्या काळातल्या साम्राज्यवादी-वसाहतवादी यंत्रणेत आपोआपच आंतरराष्ट्रीय ठरत होता. सारांश, ह्या शतकाच्या मध्यापर्यंत अशी परिस्थिती होती की, जगभरच्या लहानसहान गरीब भूप्रदेशांमधल्या देशी जाणिवांची दखल घेण्याची गरज कुणाला वाटली नाही. कारण ते संकुचित, मार्यादित भावविश्व ठरले. त्यातल्या त्यात कोणी इंग्रजी, फ्रेंच, अमेरिकन इत्यादी चलनात धडपडून व्यापार केलाच तर टागोर, अचीबे, सोयिंका अशासारख्यांची केवळ दखल घेतली जाई. एरवी देशीपणा*

*अस्तित्वातसुद्धा असू नये असे एकूण वातावरण होते.'*

युरोपमधील आधुनिकता हा योगायोग नव्हता. त्यामागे ज्ञानाचा विकास, ज्ञानाचे भान व प्रेम ह्या गोष्टी होत्या. इस्लामच्या धडक मोर्चाने त्यांचे डोळे उघडले. आम्ही आमची झापडे अधिकच ओढून घेतली आणि भक्तिसंप्रदायाच्या चिपळ्या वाजवत बसलो. युरोपमधला गजबजाट युरोपी नव्हे तर वैश्य जाणिवेचा होता आणि आज जगभर तो अस्तित्वात येतो आहे. नेमाडे नकळतपणे युरोपी समाज असे म्हणत आहेत हे लक्षात घेण्याजोगे आहे. म्हणजे किमान युरोप काही बाबतीत एक आहे हे नेमाडेंना मान्य आहे. टागोर, अचीबे, सोयिंका ह्या जुन्या गोष्टी झाल्या. खुद्द नेमाडेंची कोसला ही कादंबरी पेंग्वीनतर्फे किंवा मॅकमिलनतर्फे मार्केटमध्ये येत आहे. शेवटी तुम्ही त्यांच्यापर्यंत पोहचला नाही तर तेच तुमच्यापर्यंत पोहचले. हळूहळू मराठी साहित्यही विश्वफलकावर दिसेल अशी चिन्हे स्पष्ट दिसत आहेत. आपण अनुवाद करायचे नाहीत आणि ते मान्यता देत नाहीत म्हणून बोंब मारायची हे आपण जितक्या लवकर थांबवू तितके बरे. नेमाडेंना जाता जाता चित्रपटाबाबत एक गोष्ट सांगावीशी वाटते. आज तुमचे देशी, हिंदी चित्रपट जगभर दाखवले जात आहेत. आशिया आणि आफ्रिका ह्या दोन्ही खंडातले लोक हिंदी चित्रपट मौजेने बघत आहेत. अल्जिरियासारख्या ठिकाणी जितेंद्रसारख्या सामान्य नटाचे चित्रपट चालत आहेत. अमेरिकेत मैने प्यार कियाने चांगला धंदा करायला सुरवात केली आहे. आपण जरा साहित्यिक झापडे काढून आंतरराष्ट्रीय चित्र पाहिले तर वैश्य व दलित जाणिवेची एक नवी आंतरराष्ट्रीय संस्कृती अस्तित्वात येते आहे हे स्पष्टच आहे.

*'अशा ऊर्ध्वरचनेची सवय जडलेल्या वृत्तीला आता असे पटवून देण्याची गरज आहे की, बाबा रे, माणसाला किंवा साहित्याला आपापल्या भूमीवरच आपापल्या भाषिक समूहातच डौलाने उभे राहता येते. त्याला परदेशी किंवा आंतरराष्ट्रीय आयाम असण्याची खरोखरच गरज नसते. कोणत्याही ग्रंथाचे, वाङ्मयीन चळवळीचे, साहित्यिकांचे मोल आंतरराष्ट्रीय मूल्यांनी ठरत नसून, आपापल्या समाजाच्या आध्यात्मिक उन्नतीपासून भाषिक प्रयोगक्षमतेपर्यंत किती भूमिका ते पार पाडतात ह्यावर त्यांचे मोल ठरत असते. कोणताही थोर साहित्यिक आपापल्या काळापुरता, स्वतःच्या समूहाकरिता प्रायः लिहितो. आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या घटना, घडल्याच तर योगायोगाच्या, दुय्यम महत्त्वाच्या असतात. जागतिक ठरलेले दांती-शेक्सपिअर वगैरेंसुद्धा मुळात अत्यंत देशी लेखक होते आणि ते जागतिक ठरण्यामागे त्यांच्या समाजाची बलाढ्य साम्राज्ये कारणीभूत आहेत. एरवी कोणत्याही थोर लेखकात निद्रिस्त जागतिक होण्याचे सामर्थ्य असतेच. कुठलीही साहित्यकृती, पुतळा, चित्र, संगीत आपापल्या परिसराशी, स्थलकालाशी अतूटपणे जोडलेली*

*असते. तिच्यातील शैलीतत्त्वे, रूपबंध, आकृतिबंध आपल्या स्थळकाळाच्या खुणा अंगावर घेऊनच अस्तित्वात येतात.'*

लेखक आपापल्या भूमीवर डौलाने उभा राहतो हे मान्य. भांडण आहे ते भूमी किती द्यावर. नेमाडे म्हणतात, महाराष्ट्र. मी म्हणतो, पुरे जग. प्रत्येक थोर साहित्यिक आपापल्या काळापुरता लिहितो हे खरे. स्वतःच्या समूहाकरता लिहितो हेही खरे. पण हा समूह किती हा प्रश्न असतो. वस्तुस्थिती अशी आहे की, प्रत्येक लेखक मग व्यास असो की शेक्सपिअर असो, त्याला ज्ञात असलेल्या भूमीपुरतेच लिहीत असतो. नामदेव हिंदी पट्ट्यात जाताच त्यांनी हिंदी रचना केली. पूर्वी ज्ञात भूमी मर्यादित होती. आज सगळे जग लेखकाला ज्ञात होऊ घातलंय. टीव्हीने सगळे जग अंगणात आणायला सुरुवात केलीय. त्यावेळी लेखक केवळ देशी कसा राहू शकेल ? तेव्हा आजचा लेखक विश्वभर त्याची मुळे घेऊन उभा आहे. पूर्वीचा नव्हता. म्हणून पूर्वी 'महाराष्ट्री' असावे हा उपदेश ठीक होता. आता तो योग्य नाही. बलाढ्य साम्राज्याबाबत एक गोष्ट सांगायला हवी. बलाढ्य साम्राज्यामुळे दळणवळण नव्हे तर दळणवळणामुळे बलाढ्य साम्राज्य शक्य होते. शेक्सपिअर सर्वत्र पोहोचला, दांते सर्वत्र पोहोचला होता तो दळणवळणामुळे. बलाढ्य साम्राज्यामुळे नव्हे. आज साम्राज्य नाहीसे झाले पण दळणवळण अस्तित्वात आहे. पूर्वी साम्राज्यामुळे हे दळणवळण एकतर्फी होते. पण आता आपण आळस सोडला तर ते दुतर्फी होणे शक्य आहे. कुठलीही साहित्यकृती, कला, पुतळा, चित्र, संगीत आपापल्या परिसराशी स्थलकालाशी अतूटपणे जोडलेले असतात मान्य; पण हा जो स्थलिय अवकाश आहे हा ज्याच्या त्याच्या वैचारिक कुवतीवरही अवलंबून असतो. ए. के. रहेमानसारखा संगीतकार रोझासारख्या चित्रपटात भारतीय व पाश्चात्त्य दोन्ही संगीताचा आश्रय घेतो. नौशाद भारतीयमधून बाहेर पडत नाही. हा वृत्ती-प्रवृत्ती आणि कुवतीचा प्रश्न आहे. ज्याला नेमाडे जन्मदाते स्थळ म्हणतात ते आज केवळ त्याचा विशिष्ट प्रदेश राहिलेला नाही. नेमाडे, शेक्सपिअर, दांते हे थोर लेखक मूळचे देशी होते असे म्हणतात. नेमाडेंना मला एक प्रश्न विचारावासा वाटतो. हे लोक देशी होते म्हणून थोर होते काय ? जर केवळ देशी असणे हीच कसोटी मानावी तर ह्यांच्याबरोबर जे शेपन्नास लेखक होते तेही थोर असायला हवेत; कारण शेक्सपिअरचे समकालीन काही वसाहतवादाच्या प्रभावाखाली येत नव्हते. मग हे लेखक थोर का झाले नाहीत ? ते कमी कशात पडले ? वस्तुस्थिती अशी आहे की, ज्या कलाकृती मानवी अस्तित्वाचा, त्याचा स्वतःशी, इतरांशी आणि ह्या विश्वाशी चाललेला अनेक पातळ्यांवरचा संघर्ष आणि समायोजन मूलभूत स्वरूपात मांडतात त्या देशी तत्त्वाच्या सीमा ओलांडून बाहेर पडतात.

नेमाडे म्हणतात, आंतरराष्ट्रीय काही असत नाही. मी म्हणतो, मानवाचं मानव्य हे आंतरराष्ट्रीयच आहे. अन्न, वस्त्र, आरोग्य, निवारा यांसारख्या भौतिक गरजा, भय, सुरक्षिततेची आच, स्वार्थ, काम, क्रोध, मत्सर, प्रेम वगैरे सर्व भावावस्था ह्या आंतरराष्ट्रीय आहेत. याचे कंडीशनिंग होणे (नेमाडेंच्या भाषेत देशी संस्कृतीने बद्ध होणे) समान आहे. ह्या कंडीशनिंग होण्याविरुद्ध तो सतत  झगडतो. जुळवून घेतो, हताश होतो. कलाकृती त्याच्या ह्या भावांचे कलामाध्यमात झालेले रूपांतर असते. जगात ही कंडीशनिंग होण्याची  जी प्रक्रिया आहे ती देशपरत्वेच नव्हे तर व्यक्तिपरत्वे वेगळी असते. म्हणून विशेषीकरणाची प्रक्रिया केवळ देशापर्यंत नेऊन चालत नाही, तर ती व्यक्तीपर्यंत नेऊन भिडवावी लागते. हे कंडीशनिंग व्यक्तिपरत्वे वेगळे असल्यानेच एकाच काळात जन्मूनही नेमाडे वेगळे लिहितात, चित्रे वेगळे लिहितात, ढसाळ वेगळे लिहितात. त्यामुळेच एका अर्थाने माणूस दोनच पातळ्यांवर अस्तित्वात असतो. तो असण्याच्या पातळीवर आंतरराष्ट्रीय असतो, तर बनण्याच्या पातळीवर व्यक्तिगत असतो. प्रादेशिक, देशी, युरोपीय वगैरे आपण नंतर काढलेले सरासरी प्रमाण असते आणि ते बऱ्याचदा कृत्रिम असते. ह्या असण्याच्या पातळीने बनण्याच्या पातळीशी केलेल्या झगड्यातून व समायोजनातून अमूर्त अप्रत्यक्ष ज्ञान, समूर्त अप्रत्यक्ष ज्ञान, अमूर्त प्रत्यक्ष ज्ञान, समूर्त प्रत्यक्ष ज्ञान असे ज्ञानाचे चार प्रकार जन्मतात व ब्राह्मण जाणीव, क्षत्रिय जाणीव, वैश्य जाणीव आणि दलित जाणीव अशी जाणिवेची चार रूपे अस्तित्वात येतात. त्यांच्या तंत्रज्ञानात्मक अंमलबजावणीतून धर्म, धर्मसंस्था, धर्मविक्री, कायदा, शासन, अन्न, वस्त्र, निवारा तयार करण्याच्या पद्धती वगैरे वगैरे अस्तित्वाला येतात. ह्या साऱ्या जाणिवांचे आणि त्यांच्या तंत्रज्ञानात्मक वस्तुरूप तपशीलांचे जाळे म्हणजे संस्कृती होय. तेव्हा नेमाडे यांचे सर्व काही देशीच असते हे म्हणणे खरे नाही.

ह्या परिच्छेदानंतर नेमाडेंनी देशीयतीची चर्चा केली आहे. तेव्हा तिची चर्चा करण्याआधी आपण मुळातच आधुनिक काळात ज्याला देशी संस्कृती म्हणता येईल असे काही अस्तित्वात असते का किंवा देशी मूल्ये अशी काही अस्तित्वात आहेत का ते पाहू.

प्रथम आपण मानवी शरीर देशी असते का असा प्रश्न विचारू. नेमाडे ' मराठी साहित्य : प्रेरणा आणि स्वरूप ' ह्या ग्रंथातील पान ६७ वर ह्या संदर्भात चर्चा करताना म्हणतात, " *भारतीय माणूस भारतीय आणि इंग्लंडचा इंग्लंडसारखा. तिथल्या तिथल्या मातीचा आणि पाण्याचासुद्धा एक परिणाम होत जातो हे डार्विननंतर सांगायला नको. ज्या देशात उंच झाडे असतात तिथे उंच मानेचे जिराफ असतात हे आता शिकवायची गरज नाही*". नेमाडेंचे हे मत प्रथमदर्शनी अगदी

योग्य वाटते; पण नीट तपासले तर ह्यातून नेमाडेंचा गोंधळ स्पष्ट होतो. नेमाडे मुळात ज्या डार्विनचा हवाला देतायत त्याला हल्ली कुणी प्रमाण मानत नाहीत. पण तो वेगळा मुद्दा आहे. नेमाडेंचे 'उंच झाडे तिथे जिराफ ' ठीक आहे. पण सर्वच जिराफ सारखे असतात त्याचे काय ? जिराफाच्या एखाद-दुसऱ्या जीनच्या तपशीलामुळे उंचीत फरक पडत असेल, पण बाकीचे जीन्स जे जिराफाला जिराफत्व देतात त्यांचे काय ? नेमाडे त्याविषयी काही बोलत नाहीत. नेमाडे भारतीयांचा बदामी रंग व युरोपियनांचा गोरा रंग हा फरक दाखवतात. पण त्यांचे रक्त सारखेच असते. श्वसन, रक्ताभिसरण, पचन वगैरी संस्था सारख्याच असतात हे ते सोयीस्कररित्या विसरतात. नेमाडे किती वरवरच्या गोष्टीवरून निष्कर्ष काढतात हे ह्यावरून स्पष्ट होईल. नेमाडे जिराफाची उंची काढतात, पण माणसाची विसरतात. जपानी लोकांनी आपली सरासरी उंची सहा फुटापर्यंत नेऊन ठेवली हे सर्वश्रुत आहे. माणूस म्हणजे जिराफ नव्हे हे नेमाडेंना कुणीतरी ठणकावून सांगणे आवश्यक आहे. ही निसर्गाची कृपाच म्हटली पाहिजे की, निसर्ग नेमाडेंचं ऐकत नाही; अन्यथा युरोपियन माणसाचे रक्त भारतीयांना चालले नसते आणि जपानी माणसाचे मूत्रपिंड आफ्रिकन माणसाला अजिबात चालले नसते. आता गोष्ट पाण्याची आणि मातीची. पाणी म्हणजे $H_2O$ असे आम्ही आतापर्यंत समजत होतो. पण नेमाड्यांचे पाणीच वेगळे असल्याने त्यांनी आम्हाला वेगळेच पाणी दाखवलेय. नेमाडे महाराष्ट्रीयन पाण्याचा फार्म्युला सांगून आमचे अज्ञान दूर करतील का ?

मातीची गोष्टच न्यारी हाय. आजकाल काय बी पिकतं शेतात. अमरिकीतनं युरोपातनं काय बी येतं आणि काळ्या आईतून उगवतं बगा. समदं पीकपाणी इंटरनॅशनल फॉलमफूक झालंय. नेमाडेसाहेब, अवो, जग हा हा म्हणता फुडं गेलं. पयल्यासारखं कायबी रायलं नाय ! पयल्यांदा काय आशी जिमीन, आसं पीक ! मातीबी बदलाया लागली बगा मान्सं ! लय वंगाळ वाटतं, पन करनार काय? डोळ्यावर कातड वढून गुरावानी गप्पगार बसायचं. गावात हाय म्हून माती बगाय तरी गावती. शहरात तर समदा शिमेन्टचाच कारबार. गावामदीबी आल्यां तसं शिमेन्ट. मातीची चार-दोन घरं अजूनबी दिसत्यात. येकमातूर खरं समदी मानसं बिल्डींगा उटवायच्या मागं लागल्याती. दिसच फिरलं म्हनायचं. पुढं-मागं आख्खी जमीनच्या जमीन कलम करतील ही मान्सं ! मान्साचा काई भरवसा नायी रायला !

नेमाडेबाबा, तुमच्या देशी कल्चरची बातच न्यारी हाय. येक स्टोरीच सांगतू, आयका-

टीकास्वयंवर नावाचं बुक मार्किटमधनं आणलं आन् वाचून जीव मैना व्हवून गेला. म्हटलं, ह्यो आपला गडी. म्हटलं, हे देसी कल्चर (गावात संस्कृतीला कल्चर म्हणत्यात ठाव आसलंच

तुमास्नी. गाववाल्यास्नी हाणाय पायजेल जोड्यानं. संस्कृतीच्या जागी कल्चर आणत्यात म्हंजी काय ?) तर काय म्हणत हुतो, मी मनात म्हटलं, हे देसी कल्चर शोधाय पायजेल पयल्यांदा. मानूस कल्चर कुठं शोधतू सांगा बरं ? घरामंदी. येकदम बराबर. म्हटलं, घरच बगू. तर ध्येनात आलं, आरं, हे घर तर सिमेन्टच हाय. येकदम ईदेशी. भैनीला हाळी दिली, 'उजेऽऽ' तशी बापडी आली च्या घिऊन. अंगावर नाईटगाऊन. मनात म्हटलं, ही मीडी, मॅक्सी, स्कर्टशिवाय काय घालत नाय. ही कसली देसी भैन ? च्या आदळून म्हणाली, 'त्वांड धू आता.' येड्या मनानं सोतालाच इचारलं, फॉरिनमदी भैन भावाला च्या आणून दीत आसल का ? आसलच की ! कुणास ठाव ? सालं ही च्या प्यायची सवयबी इदेशी. आता करावं काय ? भैनीचा च्या घ्यावा की न घ्यावा ? पेस्ट काढली, बरिश काढला तवा तिच्या भन ध्येनात आलं, साल हेबी देशी नाई. त्वांड धुवाय पानी घेतलं. भसाभसा चुळा टाकल्या, मनात म्हटलं, राजा, (गावात आमास्नी राजाच म्हनत्यात. श्रीधर लय बामणी वाटतं) आरं ह्ये पाणी तरी कुठ्न आलं रं ? समुन्दरातन. आता ह्यो समुन्दर देशी का ईदेशी ? साला ह्यो प्राब्लेमच की. बा म्हणतो, पानी समद्यांचच असतं. मग म्हटलं, सालं पानी इंटरनेशनलच की, मग हगाय गेलू, ल्हान हुतो तवा रानात जायाचू, पर आता गिरामपंचायतीनं सण्डास बांधल्याती. सण्डासात बी नळ ! म्हटलं, ही फॉरेनची सिष्टीम हाय. बुढ्यांचा सण्डास तर कवाच गायब झाला. ईदेशी भाण्डं आलं. मग हातपाय धुतलं, आंग कोरडें कराय टॉवेल घेतला. म्हटलं, भन ह्यो टॉवेलबी फॉरिनचाच. टकुरं फिरलंच आपलं. कट्ट्यावर आलू. म्हाद्याला म्हटलं, दूध दे. तवा म्हाद्या म्हणतू कसा ? म्हशीचं संपलं, जर्सी गाईचं शिलकीला हाय. देऊ का ? म्या म्हनालो, "म्हाद्या, आर तुला आक्कलबिक्कल काई हाय का नाय ? जर्सी म्हंजी फॉरिनची गाय न्हव ? आरं गाय मंजी किती किती थोर ! गोमाता ! तिच्या पोटातनं फॉरीनच छत्तीस कोटी देव मिझाईल्स घेऊन आलं म्हंजे ? आपलं इंडियन गाईतलं देव त्यांच्याशी लढणार कसं ? आपल्या महान धरमाचं येळकोट हुनार नाई काय ?" म्हाद्या माझ्याकडं बगत राह्यला. मग म्हणाला, "तुला दूध पायजे का नगं ? तेवढं बोल. उगाच पाटलावानी पिरपिर करू नगंस. सांजच्याला ये, आन तमाखू दे जरा." म्या म्हटलं, अजिबात नाय. म्हाद्या इचारतु, कारं काय झालं ? म्या म्हणालू "आरं ह्यो तमाखूबी पोर्तुगिजांनी आनला आपल्या कंट्रीत. बर, राहिलं, सिगरेट तर दे. ती बी आपली न्हाय. म्याच नंतर इचारलं बीडी चाललं का ? तवा म्हाद्या म्हणतू कसा, "मला काय बॅकवर्ड समजलास काय रं ? आपन बिडी वडत नाय. सिगरेट फुंकतो." म्या गुमान निघालो. म्हाद्या मला इचारतो, "सांजच्याला येणार न्हवं ?" "नाय बा. आरं बार फॉरेनचा, दारू बी फॉरेनची. म्हाद्या, मला फक्त देसी चाललं बाबा." तवामातूर म्हाद्या भडकला, "आर

काय डोस्कं फिरलं काय तुजं ? मागल्या वरसाला कंट्री पिऊन चाळीस मानस गचकली ते इसरलास व्हय ?" म्या गप झालो. पोटात आतडं धरलंतं पर हॉटिलमधी जायाचं कसं? हॉटिलबी फॉरिनच न्हवं ? बर, आख्ख्या गावामदी सरदारचं हॉटेल बेस. तिथलं मटन, चिकन देसी का इदेसी ? म्या म्हटलं, गेलं गाढवाच्या गांडीत. घरामदी आलो. मायला बोलावलं "जेवण घाल" तिनं वाढलं. आजकाल आपन जरा टेबलखुर्चीवर बसतू पर आता ती फॉरेनची भानगड. कसं बसणार. वाकळ काढली, बसलू. माय म्हणते, "गन्या आल्ता. ट्रेक्टर बन्द पडलाया आनि खतबी आलंया" मग माज्या ध्येनात आलं, ट्रेक्टर बी इदेसी, खत बी तसं इदेशी. आपल्या बापजाद्यांनी येकच खत केलं. कंपोस्ट खत! पन ते वापरतं कोन ? ह्यो भना भात बी आरदा इदेसीच. साकर इदेसी ष्टाईलच्या कारखान्यातनं आली ती. बटाटाबी फॉरिनचाच. टोमॅटो बी इदेसीच. भन आपल खानं बी आपलं नाय रायलं. शेरात तर डोसा-इडली-रोटी.समदा नानमराठी मामला. तवर पोस्टमन आला, तवा ध्येनात आलं पोस्टमन बी इदेसी. चिठ्ठी बी इदेसी. ह्ये आननारी गाडी ट्रेन तीबी गोऱ्या सायबांनी आनली म्हून आली. "कुनाची रं ?" "म्हमईची हाय. उद्या जावं लागल मला. दोस्ताचं पतर आलया देसीवादाबर मटेरियल हवं हाय !" म्या लेटर मायला दिलं. माय सात इत्ता शिकलेली. मनात इचार आला, ही फुलेबाबाची आनि गोऱ्या सायबाची करनी. ब्रा लहानपनी म्हनायचा, "त्यो गोरा सायेब आला म्हून आपन शिकलो. नायतर ह्या बामनानी काई आपल्याला शिकू दिलं नस्तं बग. म्या ज्यास्ती शिकू शकलो नाय, पर तू शिकाय पायजेल. म्या गडी माणूस हुतो, पर आकलंनं दुकानदार झालो. तेबी मालकानं मदत केली म्हून. तू मातर मोठा हू."

म्या शिकलू. शिकता शिकता कळलं आपलं कायदं, आपलं न्याय, आपलं सरकार, हाफिसातनं चालनारा कारबार. लोकशाही, इलेक्शन, लगनाचं वय, निरोध, कारखानं समद समद सालं इदेसी हाय. म्या ह्ये समदं आठवत आठवत म्हमईला आलू. इकडं तिकडं वाचलं तवा कळलं भन नेमाडेबाबाचा देसीवादबी तिकडनं आनलाय. च्याआयला, वाटलं, बुक जाळावं, मग ध्येनात आलं बुकबी इदेसीच. त्येची छपाईबी इदेसीच. चन्द्याला लेख पायजेल हुता माजा. पर जगाबद्दल बोलनार कोन ? आपन अडानी मानूस. आपलं इंग्रजी बेताचं. मग ज्ञानी भेटली. (ज्ञानी मंजी ज्ञानदा ठाकूर) ती म्हनली, "लिहिते." म्या म्हटलं लिवच, पन जरा आयरीशबद्दल लीव, आफ्रिकेबद्दल लीव. तिनं मग येक इंटरेस्टींग गोस्ट सांगितली. म्हनाली, " श्रीधरा, (म्हमईला आमाला समदी श्रीधर म्हणत्यात आनि पोरीनं कायबी म्हटलं तरी ग्वाडच वाटतं) तर ज्ञानी म्हणाली, "नेमाडे ज्या मानवशास्त्रातील आधारे हे लिहितात ते आता जुने झाले." म्या म्हटलं, 'तू ह्येबी लिव.' मग तिनं लेख लिवला. माजं मातूर ह्ये आयकून डोस्कंच उठलं. भन देसी काय हाय

का नाय आपल्या कल्चरमंदी. आपला भेजा शोधून शोधून शिनला. डोस्कं दुखाय लागलं. तवा नेल्सनकडं गेलो. म्हटल, 'मेरीकू येक ॲस्प्रीन दे, भेजा दुक रहा है' त्येनं गोळी दिली तवा जरा डोस्कं दुकायचं थांबलं. मग ध्येनामदी आलं, च्यायला, ज्या बुकानं डोस्कं उठवलं ते इदेसीच व्हतं. आन जिनं डोस्कं थांबवलं ती गोळीबी इदेसीच व्हती. म्या मग इदेसी टेपरेकॉर्डरवर इदेसी कंपनीची कॅसेट लावून गुडूप झोपी गेलो.

वरच्या परिच्छेदात ज्यांचा उल्लेख केलाय त्या सर्व वस्तू ह्या विदेशी नाहीत, तर वैश्य जाणिवेतून निर्माण झालेल्या वैज्ञानिक गोष्टी आहेत आणि सर्व वैज्ञानिक गोष्टी जगाच्या आहेत. संरचनावाद असो, विरचनावाद असो, ह्यामागे एक वैज्ञानिक शिस्त आहे, खुद्द नेमाडे स्वतः शैलीविज्ञान वापरतात. तेव्हा हे देशी, हे विदेशी असा फरक करण्यात फारसा काही अर्थ उरलेला नाही. ह्या वैश्य जाणिवेच्या विकासाचे टप्पे प्रत्येक देशात भिन्न आहेत. पण म्हणून काही त्यांची जाणीव वैश्य जाणिवेपासून ढळून वेगळीच झाली आहे असे म्हणण्यात अर्थ नाही. प्रत्येक देशात ब्राह्मण जाणीव, क्षत्रिय जाणीव, वैश्य जाणीव आणि दलित जाणीव कमी-अधिक प्रमाणात स्थितिशील आणि गतिशील आहे. भारतात आज ज्यांना देशी म्हणून दाखवण्यात येते त्या सर्व गोष्टी चक्क ब्राह्मणी वा क्षत्रिय आहेत. देव, देवता, धार्मिक संस्कार, पूजाअर्चा, आरत्या, अभंग, प्रार्थना ह्या सर्वांतून हा देशीपणा दिसून येतो. पण हा देशीपणा म्हणजे ब्राह्मण व क्षत्रिय जाणिवेचे शिल्लक राहिलेले अवशेष आहेत. पण हे अवशेष संस्कृतीच्या केन्द्रस्थानी राहण्याचे दिवस मात्र संपलेत. नेमाडे, चित्रे वगैरे हे ब्राह्मणी पुनरुज्जीवन त्यांच्याही नकळत करू पाहात आहेत. पण मुळातच ते शक्य होणार नाही. ह्या जाणिवेतील जे चांगलं आहे ते टिकेलच, पण ते केवळ भारतात राहणार नाही. तुमचे ध्यानशास्त्र व योगशास्त्र आज संपूर्ण जगाचे झालेय. दळणवळणाची साधने व गती ह्यांच्याअभावी पूर्वी जागतिक संस्कृती अशक्य बनली होती. आता मात्र वैद संस्कृतीने विज्ञानाच्या साहाय्याने हे शक्य करून दाखवले आहे. ह्याचा अर्थ मी अनिर्बंध वैद जाणिवेचा पुरस्कार करतो असा कुणी करू नये. विवेकाचा कठोर अंकुश वैद जाणिवेवर असायलाच हवा. पर्यावरणाचा सांभाळ करण्याची पूर्ण जबाबदारी विवेकी माणसांवर पडते. ट्रेड युनियन्सनी कधी नव्हे इतके जागृत राहण्याची वेळ आली आहे. प्रत्यक्ष समूर्त ज्ञान असणाऱ्यांना प्रत्यक्ष अमूर्त ज्ञान असणाऱ्या लोकाइतकांच कसा आदर मिळेल, पैसा मिळेल हे त्यांनी पाहायला हवे. ह्यासाठी कालबाह्य झालेली मार्क्सची अडाणी संघर्षवादी वैश्य जाणीव फेकून दिली पाहिजे. त्या जागी नवी मानवतावादी वैश्य व दलित जाणीव अस्तित्वात यायला हवी. (तिचे स्पष्टीकरण इथे जागेअभावी शक्य न।ही). ह्या नव्या वैद जाणिवेला समायोजन प्रधान मानणाऱ्या संस्कृतीत

नांदायचे आहे हे तिने लक्षात घ्यायला हवे. पाश्चात्त्यांचा विरोध-विकास हा भारतीयांच्या समायोजन विकासाच्या हातात हात घालूनच नांदला पाहिजे. ह्या दृष्टीने भारताला २१ व्या शतकात जगाच्या इतिहासात फार मोठी कामगिरी बजावायची आहे. जाता जाता नेमाडेंना एक गोष्ट सांगावीशी वाटते. संस्कृती ही काही कुठली आभाळातून पडणारी गोष्ट नाही. ती अमूर्त, अदृश्य अशी वस्तुस्थिती नसून ती तुम्ही अमूर्त अप्रत्यक्ष, समूर्त अप्रत्यक्ष, अमूर्त प्रत्यक्ष, समूर्त प्रत्यक्ष ह्या ज्ञानविकासातून निर्माण झालेल्या ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व दलित जाणिवेने निर्माण केलेल्या तंत्रज्ञानातून निर्माण झालेल्या वस्तुरूपातून सतत वहात जाणारी गतिशील अशी प्रक्रिया आहे. तुम्ही खाता ते अन्न, वापरता ते वस्त्र, बांधता तो निवारा, घेता ते शिक्षण, सांभाळता ते आरोग्य ह्या सगळ्यांतून तुमची संस्कृती व्यक्त होते. वरील सर्व विवेचनावरून आपल्या संस्कृतीत ब्राह्मणी, क्षत्रिय जाणिवेतील अवशेष वगळता सर्व काही आंतरराष्ट्रीय आहे हे सहज लक्षात येईल.

आपली संस्कृती ही देशी नाही हे लक्षात येताच आपल्या मूल्याबाबत नीट विचार करता येईल. ''मराठी साहित्य : प्रेरणा आणि स्वरूप''मध्ये पान ७४ वर नेमाडे म्हणतात, *''सौंदर्यमूल्ये पूर्णपणे संस्कृतिसापेक्ष असतात काय ? ते म्हणतात नसावीत. मी म्हणतो की, सौंदर्यमूल्ये संकृतिसापेक्षच असतात. आपली मातृभाषा किंवा आपली भूमी यांच्यावर प्रेम करावं ही संस्कृतिसापेक्ष मूल्ये आहेत.''* त्याआधी ते लिहितात, *''जागतिक संदर्भ तुम्ही साहित्याला मानता की नाही किंवा लेखक-समीक्षकांनी तो मानावा का ? तर मी म्हणेन की, लेखकांनी काय किंवा समीक्षकांनी काय, हे संदर्भ अजिबात मानू नयेत. आता 'बनगरवाडी' ही आपल्याकडची अत्यंत चांगली कादंबरी. ती इंग्लंडमध्ये कोणी वाचत नाही. तुम्ही मग इंटरनॅशनल मूल्यांची काळजी कशाला करता ? तुम्ही तुमच्या मूल्यांची, कादंबऱ्याची काळजी घ्या. युरोपियन राष्ट्रांचा इंटरनॅशनॅलिझम होता तो एवढ्याचसाठी की त्यांची मूल्ये आपण मान्य करावीत. दीडशे वर्षे इथ राहून बादलीतून अंघोळ करावी एवढं साधं मूल्य त्यांना आपल्यापासून घेता येऊ नये ! म्हणजे आपल्याकडून त्यांनी काहीच घ्यायचं नाही आणि आपण तेवढं घेत रहायचं हे संस्कृतीला मारक आहे. हिंदुस्थानात आज दोनशे चांगल्या कादंबऱ्या असतील तर त्या जगाला माहीत नाहीत आणि आपण मात्र त्यांच्या फालतू कादंबऱ्यांतून मूल्य शोधतो हे मला मान्य नाही.''* (पान ७३-७४)

नेमाडे म्हणतात, मूल्ये संस्कृतिसापेक्ष असतात. मला वाटते, आधुनिक मूल्ये बहुतांशी नसतात. उदा. मातृभाषेवर प्रेम व देशावर प्रेम. नेमाडे म्हणतात तसे हे मूल्य अजिबात देशी नाही.

सर्वच देशांच्या ठायी ते आढळते. आदिवासीही आपली भूमी सोडायला तयार नसतात. तेव्हा मातृभाषेवर व देशावर प्रेम हे मूल्य सार्वत्रिकच आहे. वैश्य जाणिवेने निर्माण केलेली मूल्ये ही तर पूर्णपणे जागतिक आहेत. उदाहरणार्थ, बहीणभावांनी लग्ने करू नयेत. अशा लग्नामुळे जेनेटिक कोडवर विपरीत परिणाम होतो म्हणून अशी लग्ने करू नयेत. हे मूल्य वैज्ञानिक सिद्धांतावर अवलंबून आहे. अशी सर्वच वैज्ञानिक मूल्ये ही जागतिक आहेत. पतिव्रत्य हे क्षत्रिय जाणिवेचे मूल्य; पण विज्ञान सांगते की स्त्री-पुरुष एकत्र झोपले तर वैज्ञानिकदृष्ट्या काहीच फरक पडत नसून कंडोम वापरला असता मूलही होत नाही. त्यामुळे जर दोघेही हे वैज्ञानिक सत्य स्वीकारतील तर लग्नाआधी संभोग करणे हे सहज स्वीकारायचे मूल्य होईल. लग्नाआधी संभोग करणे आता भारतातही स्वीकारले गेले आहे. कारण कंडोम ही देशी बाब नसून जागतिक आहे. आज जगातील सर्व सत्ये ही विज्ञानाच्या कसोटीवर घासून पाहिली जातात. नेमाडे हे क्षत्रिय जाणिवेत अडकल्याने त्यांना ही मूल्ये, त्यांत होत चालणारे बदल दिसत नाहीत. झाडे तोडू नयेत, त्यामुळे पर्यावरणाचा तोल ढळत चाललाय, ह्यातील झाडे तोडू नका हे मूल्य जागतिक आहे. तेव्हा नेमाडे एखादे मूल्य मला सांगत असतील तर मी ते नैतिकतेच्या कसोटीबरोबर विज्ञानाच्या कसोटीवरही घासून पाहणे पसंत करीन. मी जी इंटरनॅशनल मूल्यांची काळजी घेतो त्याचे कारण ती माझ्या देशाच्या संदर्भातही महत्त्वाची ठरतात. झाडे तोडू नका हे माझ्या देशाच्या संदर्भातही अमेरिका, युरोपइतकेच महत्त्वाचे असते. आता बादलीतून आंघोळ करणे हे मूल्य ! ह्यात भारतासंदर्भात आंघोळ करणे हे महत्त्वाचे. कारण उष्ण हवामान व निघणारा घाम. बादली की टब दुय्यम आहे. माझ्यासारखा माणूस दोन्ही पसंत करेल. मात्र शॉवर मिळाला तर अधिक बरे म्हणेल. ब्रिटिश इथे अंघोळ करत नसत असे नाही. काही अंघोळ करत नसत; पण हे वैज्ञानिक मूल्य न कळल्याने आलेला अडाणीपणा आहे. तो ब्रिटिशांचा म्हणून क्षम्य नाही. दलाई लामानीही हा अडाणीपणा दाखवला आहे. पत्रकार परिषदेत अंघोळ न केल्याने लामांच्या अंगाला घाण वास येत होता. तेव्हा हा अडाणीपणा ब्रिटिशांचाच नाही. युरोपच्या थंडीत जाऊन मूर्खासारखे भारताप्रमाणे दिवसातून तीन तीन वेळा अंघोळ करणारे भारतीय महाभाग आहेतच. उद्या हे महाभाग एखाद्याने नवस सुचवला तर युरोपमध्ये बर्फाचीही अंघोळ करतील आणि काकडत काकडत गायत्री मंत्र म्हणतील. कादंबऱ्यांचा अनुवाद व वाचन हा दळणवळणाचा प्रश्न आहे. तुमच्याकडे तरी टॉलस्टॉय, कुन्देरा किती जणांनी वाचलाय ? ऑक्टोव्हिया पॉझचं नाव किती मराठी कवींनी ऐकलंय ? ही परदेशी माणसे सोडा. दिलीप चित्रे किती मराठी वाचकांना माहीत आहेत ? शेक्सपिअर त्यांनी इथं आणून ठेवला. तुम्ही माडगूळकर घेऊन तिथे पोहचलात ? विक्रम सेठ आज प्रचंड खपतो; किंबहुना बेस्ट सेलर आहे.

तुम्ही क्षत्रिय जाणिवेतून कादंबऱ्या लिहिणार आणि वैश्य जाणिवेत वाढलेल्यांना त्या थोर म्हणून सांगणार. हे लग्न जमायचं कसं ? तेही हल्ली जमते आहेच. असो. सांगण्याचा मुद्दा हा की, देशी मूल्ये ही कल्पना क्षत्रिय जाणिवेतून आली होती आणि ती देशी होती. नवी वैश्य जाणिवेतून जन्मलेली वैज्ञानिक मूल्ये इंटरनॅशनल आहेत.

ह्या सर्व पार्श्वभूमीवर नेमाडेंच्या देशीयतेकडे वळू. नेमाडे म्हणतात,

*"प्रादेशिकतेच्या संकल्पनेत प्रदेशविशिष्ट लक्षणांचा प्रायः विचार केला जात असल्याने पोटभाग-पोटसंस्कृती-प्रधान दृष्टिकोन प्रबळ ठरतो. देशीपणाचे एक उपांग म्हणूनच त्याचा विचार करता येतो.*

*देशी याचा अर्थ त्या भूमीशी जोडलेले असणे असा प्रायः होतो. खरे तर प्रत्येक वस्तू देशीच असेल तर देशीपणाची चर्चा करण्याची गरज काय ? परंतु देशी नसलेल्या परक्या, बाहेरून येणाऱ्या अनेक मूल्यांचे, भाषांचे, संस्कृतींचे देशी मूल्यांवर, भाषांवर व संस्कृतींवर जेव्हा आक्रमण होते, तेव्हा स्वतःच्या अस्तित्वासाठी मानवी समूहांना देशीवादी व्हावे लागते. वस्तुतः देशीपणा ही अत्यंत स्वयंभू, झाडाझुडपांसारखी सोशिकपणे आपआपल्या जागेवर उगवणारी व टिकून राहणारी संकल्पना आहे. परंतु तिलाही आक्रमक व्हावे लागते असे सांस्कृतिक कसोटीचे क्षण येतात. या वेळी अत्यंत नम्रतेने बोलणाऱ्या ज्ञानेश्वरालासुद्धा "दाऊ वेल्हाळ देशी नवा' असे आक्रमक व्हावे लागते किंवा भटोबासारख्या गाढ्या पंडितालाही "तुमचा अस्मात कस्मात मी नेणे गा : मज श्रीचक्रधरे, निरूपिली मऱ्हाटी : तियाची पुसा : " असे 'संकुचित' किंवा 'दुराग्रही' व्हावे लागते. देशीपणाच्या संकल्पनेत स्थितिशीलत्व अबाधित राखणारी स्वाभाविक अवस्था, हा अर्थ अभिप्रेत असतो. देशीवाद ह्या संकल्पनेत त्याच गुणांची लढाऊ वृत्ती, आपल्या अस्तित्वाचा हक्क प्रस्थापित करण्याची आग्रही वृत्ती प्रकट होते. देशीवाद हा अर्थातच देशीपणाची एक तात्कालिक अवस्था असते. देशीयता हा शब्द आपण ह्या दोन्ही अवस्थांना सामावणारा म्हणून वापरू."*

*वेगवेगळ्या समाजांमध्ये देशीपणाच्या संकल्पनेला वेगवेगळी मूल्ये चिकटलेली दिसतात. दि ऑक्सफर्ड इंग्लिश डिक्शनरी (आवृत्ती १९७१) मध्ये देशी किंवा* **नेटिव** *ह्या शब्दाचा अर्थ वंशवादी दिसतो :*

*"**नेटिव** : एखाद्या देशाचा मूळचा वा नेहमीचा रहिवासी, जो परकीय आणि परदेशी लोकांपासून वेगळा समजला जातो. हल्ली विशेषतः बिनयुरोपी आणि कमसंस्कृत अथवा असंस्कृत*

*रानटी वंशाचा काळसर (कलर्ड) किंवा काळा माणूस."*

*आता अशी व्याख्या करणारे लोक अमेरिकेत जाऊन तेथील देशी संस्कृतीचा निःपात करणार हे उघडच आहे. इंग्लंडमध्ये दडपून नेस्तनाबूत झालेल्या देशी समूहांनी काही चळवळी उभारल्या तर त्यांना 'नेटिव' न म्हणता 'वेल्श राष्ट्रवाद', 'स्कॉटिश राष्ट्रवाद', 'गेलिक पुनरुज्जीवनवाद' अशा उथळपणाने देशीपणाची संभावना हेच लोक करत असतात. जणू काही अशा देशी प्रवृत्तीच्या चळवळी ब्रिटिश साम्राज्यवादासारख्या आंतरराष्ट्रीय विशाल प्रवृत्तीच्या तुलनेत क्षुद्र, बुरसटलेल्या, फुटिर असतात.*

*ऑस्ट्रेलियात आणि बऱ्याच श्वेतवर्णीयांत आफ्रिकी वसाहतींमध्ये तर देशीपणाचीसुद्धा बहुस्तरीय व्यवस्था केलेली आढळते, ती अशी :*

*१. प्राचीन काळापासूनचे आदिवासी किंवा कृष्णवर्णीय देशी.*

*२. परके पण अनेक पिढ्यांपासून रहिवासी झालेले गौरवर्णीय देशी.*

*३. स्थलांतर करून आलेले बिगर गौरवर्णीय देशी.*

*अमेरिकेत तर बाहेरून म्हणजे प्रायः युरोपातून आलेल्या उपऱ्या गोऱ्या लोकांनी अमेरिकेतल्या मूळच्या संस्कृतीचा नायनाट केल्यामुळे आता देशीवाद म्हणजे "मूळच्या रहिवाशांच्या बाजूचा आणि बाहेरून आलेल्यांच्याविरुद्ध असलेला पूर्वग्रह, मूळच्या लोकांचे संरक्षण करण्याचे धोरण व आचरण" असा समजला जातो.*

प्रत्येक गोष्टीला उपांग असते हे नेमाडेंना मान्य आहे. मात्र तुमचा देशही विश्वाचे उपांगे आहे हे नेमाडेंना मान्य नाही. खरं तर प्रत्येक गोष्टीला उपांग असतात आणि प्रत्येक गोष्ट मोठ्या गोष्टीची उपांग असते. मागील विवेचनावरून भारतीय संस्कृती वैश्य जाणीवप्रधान विश्वसंस्कृतीची उपांग आहे हे सहज लक्षात आले असेल.

नेमाडे परक्या मूल्यांचे, भाषांचे देशी संस्कृतीवर आक्रमण होते म्हणून प्रतिकारासाठी, अस्तित्वलढ्यासाठी देशीवाद येतो असे इथे सुचवतात. परकी मूल्ये व परकी संस्कृती वगैरे संकल्पना चुकीच्या असून वैश्य संस्कृती आणि वैश्य मूल्ये आली हे पूर्वीच सिद्ध केले आहे. चीनमध्ये कसलेही आक्रमण न करता जसा बुद्ध धर्म पसरला तशी वैश्य जाणीव जगभर पसरत चाललीय. ती सुरुवातीला आक्रमक होती, त्यावेळी तिला प्रतिकार करण्यासाठी प्रतिवैश्य जाणीवच निर्माण करावी लागली हे इथे ध्यानात आणून द्यावेसे वाटते. आताही गॅटच्या दुष्परिणामांना तोंड द्यायचे असेल तर जाज्वल्य प्रतिवैद जाणीव निर्माण करावी लागणार आहे. मात्र वैद जाणीव ही

मुळातच देशीवादाला नाकारत असल्याने (त्याशिवाय ती वैश्य ठरूच शकत नाही) नेमाडेंचे विचार स्वीकारता येत नाहीत. नेमाडे तलवार घेऊन बंदुकीशी लढत आहेत. मी म्हणतो मिझाईल्स घेऊन लढा, तरच तुमचा निभाव लागणार आहे.

नेमाडे यांनी ज्ञानेश्वरांचे आणि भटोबांचे उदारहरण दिले आहे. मुळात नेमाडे (इथे तर हा अनेकांचा वादाचा मुद्दा आहे.) म्हणतात तसे हा लढा संपूर्ण ब्राह्मण जाणिवेविरुद्ध नव्हता, तर ब्राह्मण जाणिवेने क्षत्रिय जाणिवेशी साहचार्य करावे असे तिथे अपेक्षित होते. (म्हणूनच भक्तीसाठी राम, कृष्ण, बुद्ध, महावीर या क्षत्रियांची निवड झाली.) भक्तियोग हा ब्राह्मण जाणिवेच्या गीतेमध्ये बीजरूपात होताच. शंकराचार्यांच्या 'गुरुबोध सार' मध्येही तो आहेच. ह्या सर्वांपेक्षा प्रखरपणे सरहपा व तिलोपात तो आहे. आपल्याकडच्या अनेक दलितांना इथे सांगावेसे वाटते की, भक्तियोग हा बुद्ध परंपरेला परका नाही. तुकाराम इथं झक मारेल अशा प्रखरतेने सरहपाने व तिलोपाने तुकारामाआधी शेकडो वर्षे गीतरचना केली आहे. दुर्दैवाने आपल्याकडील दलित लोकांचे बुद्धाचे आकलन हे आंबेडकरांनी जेवढे लिहिले तेवढ्यावरच अवलंबून असते. त्यामुळे त्यांना तिलोपा वगैरे मंडळी माहीत नसतात. (नेमाडे कारण नसताना इस्लाममध्ये जो हिंदू भक्तियोग शोधतात त्याला फारसा अर्थ नाही. हिंदू भक्तियोग फार जुना आहे आणि मूर्तिपूजा अजिबात न माणणाऱ्या इस्लामशी त्याची नाळ जुळवणे फारसे अर्थपूर्ण नाही.) ज्ञानेश्वरांचा झगडा ब्राह्मण जाणिवेच्या अंतर्गत चाललेला ब्राह्मण विरुद्ध ब्राह्मणेतर असा झगडा आहे आणि क्षत्रिय जाणीवेने त्याला साथ दिली आहे. कधी कधी हा झगडा ब्राह्मण जाणीव विरुद्ध क्षत्रिय जाणीव असाही आकार घेताना दिसतो. विशेषतः बौद्धांत बुद्ध धर्मातला भक्तिपंथ हा गुरुप्रधान आहे. बुद्धापेक्षा बुद्धत्व प्राप्त करून देणाऱ्या गुरूला तिथे महत्त्व आहे आणि ब्राह्मण जाणिवेला अतिशय कडवा विरोध तिथे आढळतो. कळीचा मुद्दा असा की, नेमाडे म्हणतात तसा महाराष्ट्रातील हा झगडा परकी व देशी मूल्यांचा नाही तर देशातीलच एका जाणिवेच्या वाटपाचा आहे. ह्यामध्ये ब्राह्मण जाणिवेचे ज्ञान जे संस्कृतमध्ये व ब्राह्मणांमध्ये बद्ध आहे ते ब्राह्मणेतरांसाठी मुक्त करण्याचा आग्रह आहे. संस्कृत ही इथे परकी नाही तर विशिष्ट वर्गाची आहे. ब्राह्मण जाणिवेविरुद्ध सर्वकष लढा (सामाजिक, राजकीय वगैरे सर्वच पातळ्यांवर) इथे कुणालाच अभिप्रेत नव्हता. हा लढा फक्त जैन व बौद्धच लढू शकत होते, पण ते पराभूत झाले होते.

नेमाडे युरोपियनांच्या आदिवासींकडे पाहण्याच्या दृष्टिकोनावर जी टीका करतात ती पूर्ण योग्य व खरी आहे. युरोपियनांचा माज त्यातून दिसतो. पण प्रश्न असा आहे की, नेमाडे आदिवासींचे काय करणार आहेत ? त्यांना तसेच आदिवासी ठेवणार आहेत, त्यांची देशीयता जपणार आहेत,

की त्यांना आधुनिक समाजाच्या वैश्य जाणिवेत सामावून घेणार आहेत ? नेमाडे ह्याविषयी काहीच बोलत नाहीत, किंबहुना नेमाडे समाजाच्या प्रगतीची, विकासाची कसलीच व्याख्या किंवा विचारप्रणाली मांडत नाहीत. किंबहुना अशी काही मीमांसा त्यांच्या डोक्यात आहे ह्याबाबत शंका वाटते. नेमाडेंच्या कादंबऱ्यांतले सर्व नायक हे समीक्षक नेमाडेंचे सहोदर आहेत. ते टिपिकल हिंदूंच्याप्रमाणे शाब्दिक बडबड करतात आणि परिस्थिती बदलण्यासाठी कृती करण्याची वेळ आली की ते गाव सोडून पळून जातात. अर्थात सतत तडजोड करणाऱ्यांच्या देशात तडजोड न करता केलेले अशा प्रकारचे पलायन ही देखील धैर्याची गोष्ट ठरते. पण कादंबरीत जी गोष्ट स्वीकारता येते तशी समीक्षेत स्वीकारणे कठीण असते. इथे मूल्यनिर्णय करावाच लागतो.

माझ्या मते आदिवासींना आधुनिक संस्कृतीत सामावून घेणे गरजेचे आहे. आदिवासींना एकाच वेळी टीव्ही दाखवायचा आणि परंपरागत नाचा म्हणून सांगायचे ह्याला फारसा अर्थ नाही. ह्याचा अर्थ ते नष्ट करायचे असा नाही, तर ते मुख्य प्रवाहात सामील करून घ्यायचे. त्यांच्या कला मुख्य प्रवाहात आणून सोडायच्या. आदिवासींना तसेच ठेवले तर ते कशा प्रकारे वापरले जातील हे वेठबिगारीने व्यवस्थित दाखवून दिलेय. एकीकडे वेठबिगार तर अमेरिकेसारख्या देशात टूरिस्ट सेंटर. प्राणिसंग्रहालयात प्राणी बघायला यावेत तसे लोक हे आदिवासी कसे आहेत, कसे राहतात ते बघायला येतात. माझ्या मते ह्यांच्या अस्तित्वाचा, मनुष्यत्वाचा हा अपमान आहे. तेव्हा उगाच देशीयता म्हणून त्यांची संस्कृती जपण्यापेक्षा त्यांना मुख्य प्रवाहात आणणे गरजेचे आहे. हे करताना त्यांची जमीन हडपली जाणार नाही, त्यांचे आर्थिक शोषण होणार नाही याची काळजी घ्यायला हवी. ह्या कामात विवेक महत्त्वाचा आहे.

नेमाडे पुढे म्हणतात,

*"हिंदुस्थानात पुरातनकाळी जनच्छेद झाल्याच्या खुणा इतिहास-पुराणांत आढळतात. त्याहूनही भयंकर पर्याय म्हणून एखाद्या वंशाच्या लोकांना जन्मानेच दास ठरवून किंवा अस्पृश्यतेचा अदृश्य तुरुंगच उभारून गुलामीचे जिणेही लादलेले आढळते. तरीही इतक्या प्राचीन काळापासून इतक्या विशाल उपखंडात सातत्याने अनेक वंशांचे लोंढे येत गेले आणि निरनिराळ्या भूप्रदेशात पसरत गेले आणि त्या सर्वांना आपापल्या रीतिरिवाजांसह देवदैवते, रीतीभाती, पोशाख, खाण्यापिण्याच्या बहुविध पद्धतींसह सामावून घेण्याच्या दोन महत्त्वाच्या बृहत्व्यवस्था आपोआपच प्रस्थापित झाल्याचे दिसते. एक म्हणजे जातिव्यवस्था आणि दुसरी म्हणजे देशव्यवस्था. हिंदुस्थानच्या इतिहासात आणि भूगोलात कोणत्याही माणसाला ह्या वांशिक आणि प्रादेशिक अशा दोन आडव्या-उभ्या अक्षांवर जागा सापडली, की तो मानाने आपले अस्तित्व*

टिकवू शकतो. अमुक माणूस कोणत्या जातीत जन्मला आणि तो कुठल्या प्रदेशातला आहे या दोन गोष्टींवाचून कुठल्याही भारतीय माणसाची ओळख पटणे अशक्य आहे. ह्या दोन्ही व्यंवस्थांच्या परस्परछेदांनी अधिक सूक्ष्मतर अशा अनेक उपव्यवस्थांचे विस्तीर्ण बहुरंगी पट हिंदुस्थानात आढळून येतात. परंतु ह्या उपखंडात कोणालाही जाती आणि देश ह्या दोन स्थूल आयामांशिवाय स्थिर अस्तित्व प्राप्त होत नाही. फार काय, ह्या बृहत्व्यवस्था न मानणाऱ्या समूहांनासुद्धा ह्याच व्यवस्थांनी ओळखले जाते. उदाहरणार्थ, अरण्यात दडून राहिलेले आदिवासी किंवा आंतरप्रांतीय, आंतरजातीय संबंधामधून निर्माण झालेले उपसमूह.

भारतीय समाजाच्या ऱ्हासकाळात जातिव्यवस्थेला श्रेष्ठ-कनिष्ठ उतरंडीचे मूल्य ह्याच ऊर्ध्वव्यवस्थांच्या स्तरीकरणामुळे प्राप्त झाले. वस्तुतः मुळात कोण, कुठे आणि कोणत्या जमातीत जन्मला ही मूल्यनिर्णयाची कसोटी होऊ शकत नाही. एक मात्र खरे की, ह्या दोन बृहत्व्यवस्थांमुळे कोण्या माणसाला ह्या उपखंडात कुठेही वसाहत करून राहण्याचे स्वातंत्र्य असल्याने जिथे वास्तव्य करायचे त्या प्रदेशाला स्वीकारावे लागते. अशा रीतीने आपल्या देशात देशीकरणाची प्रक्रिया अव्याहतपणे चालत आली आणि एका छोट्याशा प्रदेशातही अतिसूक्ष्म समूहांनी सबंध समाजाचे पोत घडत आले आहे. त्यामुळे पारशी लोक भारतीयही आहेत, पण मूळचे इराणी आहेत. मराठी मुसलमान, महाराष्ट्रातील मारवाडी, दक्षिणेतील मराठे वगैरे सहस्रावधी जमातींनी आपापला मूळ देशीपणा न घालवता भाषा, धर्म, अन्न-वस्त्रादी शैली , चालीरीती आपल्या अस्तित्वाबरोबर टिकवल्या. ह्यामुळे भारतीय परंपरेत देशीपणाच्या अचल भौगोलिक तत्त्वाची संकल्पना नेहमीच उभ्या-आडव्या धाग्यांनी घट्ट विणली गेली आहे. म्हणून हिंदुस्थान हे केवळ एककेंद्री राष्ट्र नसून हळूहळू बदलत जाणारे बहुकेंद्री, बहुअक्षी भूमिसातत्य आहे.

अशा भूमिसातत्यावरील अनेक युगांचा इतिहास विलक्षण वेगवेगळ्या प्रक्रियांनी आजपर्यंत घडत आल्याने येथील पुरातन काळापासून अंतर्वर्ती घडामोडींचे स्फटीकीकरण एखाद्या छोट्याशा पुराणकथेत किंवा लोककथेतसुद्धा झालेले आढळेल. भारतीय मनात जुन्या-नव्या घडामोडींचे सत्त्व अशाच स्थळकाळांनी निश्चित केलेल्या भूमिप्रधान देशी परंपरांनी तयार होते. त्यामुळे या उपखंडात आपापला परिसर आणि पुरातनकाळापासून टिकविलेले सांस्कृतिक स्वातंत्र्य ह्यांचा समृद्ध आविष्कार आढळतो. ह्या आविष्काराच्या बहिर्वर्ती खुणा म्हणजे वेगवेगळ्या परिसरातल्या आपल्या दृश्य व्यवहाराच्या पोशाखासारख्या शैलीत सापडतील. वायव्येकडील पठाणाचा पोशाख हा जसा त्या भूमीचा सांस्कृतिक आविष्कार आहे, तशीच दक्षिणेतील मितपोशाखी शैली तिथला देशी आविष्कार आहे. हे एक उदाहरण झाले. अशीच त्या त्या परिसरातील ती ती वस्तू, प्राणी

*आणि वनस्पती, आचार, विचार हे सर्व अतूटपणे त्या त्या प्रदेशाचे आहे. ह्या सर्व अंतर्वर्ती व बहिर्वर्ती आविष्कारात स्वायत्तता, विकेंद्रीकरण ह्या महत्त्वाच्या तत्त्वांची मुक्त वाढ दिसून येते. सारांश, विविधतेत एकता असणे ह्याचा अर्थ देशीपणाच्या ह्या अनंत आविष्कारांच्या मुळाशी असलेले परस्परावलंबी भूमितत्त्व होय. जगातल्या प्रत्येक संस्कृतीने स्थलमाहात्म्य मानले आहे. राष्ट्रीयत्व हे त्याचे एक ढोबळ स्वरूप होय. हद्दपार करणे, तुरुंगात टाकणे, अंधारकोठड्या ही शिक्षेची रूपे माणसाला त्याच्या प्रिय भूमितत्त्वापासून वंचित करण्याची क्रूर साधने होत.''*

नेमाडे ज्या गोष्टींचा विचार इथे मांडत आहेत ती एक भूतकालीन घटना आहे. जातिव्यवस्था का आणि कशी मोडत आहे याचे विवेचन मागे आले आहेच. देशव्यवस्थाही अशीच नष्ट होण्याच्या मार्गावर आहे. वैद जाणिवेत वावरणारी संस्कृती ही मुळातच दळणवळणाच्या साधनांबाबत इतकी तीव्र प्रगती करत असते की हळूहळू प्रत्येक माणसाचा भूमिविस्तार वाढत जातो. पूर्वी तांत्रिक प्रगतीअभावी देशव्यवस्था टिकली. खरेतर प्राचीन काळीसुद्धा जेव्हा पशुपालन हा मुख्य व्यवसाय होता, लोक सतत भटकत होते, अनेक भटक्या जातीजमाती तर पहिल्यापासूनच भटकत आहेत. आता अशा सर्वच लोकांच्या पायाला चक्र बांधले गेले आहे. मुळात जातीचा व ळप वा समूह ही गोष्ट भूतकाळात जमा होत चाललीये आणि कुटुंबे वा व्यक्ती पोटापाण्यासाठी गावं, भूमी सोडून स्थलांतर करीत आहेत. त्यामुळे भूमिसातत्य अस्तित्वात असले तरी अंतर्गत स्थलांतर दूर झाले आहे. सर्वात महत्त्वाची गोष्ट संस्कृती पूर्वीच्या काळी होती तशी भूमिनिष्ठ राहिलेली नाही. वैद जाणिवेने भूमी ही विक्रय वस्तू बनविल्याने आणि उत्पादनाचे एक साधन बनविल्याने भूमीचे संस्कृतीतील भावात्म मूल्य संपले आहे. अन्न, वस्त्र, निवारा ह्या सर्वच बाबतीत आपण हळूहळू देशी न राहता आंतरराष्ट्रीय झालो आहोत. जगातील कुठलाही कपडा मी आज वापरत असतो. एकाच आठवड्यात जीन, पंजाबी ड्रेस, शर्ट-पॅण्ट आणि साडी एकाच स्त्री-पुरुषांच्या अंगावर दिसत आहे. पूर्वी हद्दपारी ही शिक्षा होती. अलीकडे माणसेच गाव सोडून शहरात, शहर सोडून मुंबईसारख्या महानगरात, महानगर सोडून विदेशात कसे जाता येईल ह्याच्या चिंतेत आहेत.

*साहित्याच्या जडणघडणीत देशीपणाचे तत्त्व किती मर्यादेपर्यंत प्रस्थापित करता येईल ह्याचा आता विचार करू. लेखक, साहित्यकृती, वाचक आणि परंपरा हे साहित्याचे चार महत्त्वाचे घटक तपासले तर ह्या सर्वांना सामावून घेणारे देशीपणाचे तत्त्व हे शैलीसारखे व्यापकधर्मी (म्हणजे सर्व घटकांमध्ये) सापडणारे तत्त्व आहे ? की तो साहित्यातला आशयासारखा एक सेंद्रीय घटक आहे ? की तो साहित्याबाहेरचा परंतु पर्यायाने त्याला उपकारक असा माध्यमासारखा बाह्यवर्ती*

घटक आहे ?

साहित्यकृतीच्या वैश्विकतेबद्दल नेहमीच बोलले जाते आणि अडाणी साहित्याभ्यासक आंतरराष्ट्रीयता म्हणजेच वैश्विकता समजतात. खरे तर वैश्विकता ही देशीपणाच्या विरोधी संकल्पना नव्हे. वैश्विकता म्हणजे भिन्न भिन्न ठिकाणच्या देशी शैलींचा भिन्न भिन्न स्थितींमध्ये आस्वाद घेणे होय. ह्या वेगवेगळ्या प्रदेशांमधील कृतींमध्ये एकरूपता नसते. आहे त्या स्थितीत ह्या सर्वांचा उपभोग घेणे असा उदारपणाचा रसास्वाद वैश्विकतेच्या संकल्पनेत अपेक्षित असतो. जसे असेल तसे असो, हे तिचे लक्षण असते.

ह्याच्या उलट वसुधैवकुटुंबी वृत्ती म्हणता येईल. वसुधैवकुटुंबी वृत्तीत भिन्न भिन्न ठिकाणच्या कृतींमध्ये एकरूपता पाहणे, एकजातीयता शोधणे हे अपेक्षित असते. वैश्विकता आणि वसुधैवकुटुंबी वृत्ती ह्या दोन्हीत भोगणाऱ्याच्या वृत्तीचा फरक दिसून येतो. देशीयतेत त्या त्या ठिकाणच्या कृतींचें स्वतंत्र अस्तित्व मान्य केलेले असते. ह्याउलट वैश्विक अथवा वसुधैवकुटुंबी ह्यां दोन्ही वृत्तींमध्ये तुलनात्मक परिणाम अपेक्षित असतो. परक्या, व्यत्यय आणणाऱ्या, साम्राज्यवादी, भोगवादी वृत्ती किंवा भांडवलशाहीप्रणीत मधुकरवृत्ती, तसेच दुसरीकडून किंवा बाहेरून लादलेल्या ऊर्ध्वव्यवस्था ह्या सर्व देशीपणाला हानिकारक समजल्या जातात. त्याचबरोबर असंपर्कित देशीपणात अंतर्जनासारखे हानिकारक घटक निर्माण होतात आणि तिचे स्वत्वच धोक्यात येऊ शकते.

एखादी साहित्यकृती मुळात देशी असते. परंतु वैश्विक होऊ शकते. मग ती वैश्विकता एखाद्या अज्ञात कवीच्या वैश्विकतेसारखी निद्रिस्त असो, की शेक्सपिअरसारख्याच्या वैश्विकतेप्रमाणे गवगवा होऊन जागृत स्वरूपाची असो. देशी असणे ही कुठल्याही साहित्यकृतीची प्राथमिक गरज आहे. सर्व कलांना मिळणारा वैश्विक प्रतिसाद हा मानवजातीच्या मूलभूत देशीपणाची साक्ष समजला जातो.

तौलनिक साहित्यविचारातही असे सिद्ध केले जाते की, कलाकृती ह्या अनन्यसाधारण कधीच नसतात. कारण कोणत्या तरी समान तत्त्वाच्या आधारे त्यांचे वर्गीकरण हे करता येतेच. संविधानके, रूपसंबंध, संरचना, प्रतीके, पात्रे, आशयसूत्रे, कथनतंत्रे, तत्त्वे, शैलीप्रकार, मूल्ये इ. घटक जगभरच्या साहित्यकृतींमध्ये सार्वत्रिकपणे आढळतात. अर्थात ही समानता त्या त्या देशीवैशिष्ट्यांशिवाय अस्तित्वात आलेली नसते आणि ही देशी वैशिष्ट्ये गृहीत धरल्याशिवाय दोन भिन्न संस्कृतींच्या किंवा भिन्न भाषांच्या साहित्यकृतींची तुलना करता येत नाही.

माणसाच्या सर्व कृतींमागे तृष्णा असतेच. ह्या तृष्णेतून निर्माण होणाऱ्या कृती वेगवेगळ्या असल्या तरी अस्तित्वाच्या काम, क्रोध, सत्तेची लालसा, अज्ञाताचे वाटणारे भय, सुरक्षिततेचा सतत चाललेला शोध वगैरे प्रेरणा समानच असतात. पूर्वी भिन्न भिन्न देशी शैली होत्या; पण त्या हळूहळू नष्ट होत चालल्या आहेत. त्यामुळे कृतीतही एकरूपता आढळते. पण ही एकरूपता गणिती नाही तर व्यक्तिपरत्वे भिन्न आहे. खून, आत्महत्या, निराशेत डुंबणे, फ्रस्ट्रेशनमध्ये त्या त्या गावात वा नगरात वारेमाप भटकणे वगैरे कृती समानच आढळतात. पण प्रत्येक लेखकाचे त्याच्या लेखनातील पात्राचे संस्कारण (कंडीशनिंग) वेगळे असल्याने लेखकपरत्वे वा पात्रपरत्वे भिन्नत्व आढळते. ह्या व्यक्तीगततेला मान्यता देणे ही आस्वादाची प्राथमिक अट आहे. त्याला नेमाडे वैश्विकता म्हणतात ते काही खरे नाही. उलट भिन्न कृतीतून किंवा कंडीशनिंगमधून तृष्णेच्या मूलभूत गाभ्यापर्यंत त्यातल्या वेगवेगळ्या आवेगापर्यंत लेखक वा कलावंत किती खोल पोहचला ह्यावर त्याची वैश्विकता अवलंबून असते. ही वैश्विकता अनुभवून सर्व मानवजातीविषयी बुद्धाप्रमाणे करुणा निर्माण होणे म्हणजे वसुधैवकुटुंबी वृत्ती होय. नेमाडे वैश्विकतेला वसुधैवकुटुंबवृत्ती व वसुधैवकुटुंबवृत्तीला वैश्विकता समजण्याची गफलत करत आहेत. साम्राज्यवादी, भोगवादी किंवा मधुकरवृत्ती हे घटक देशीपणाला कसे काय हानिकारक ठरले ? इंग्लंड वगैरेचे ह्यात भलेच झाले. भारताचे ह्यामुळे वाईट झाले म्हणता येईल का ? दुसरा बाजीराव पेशवे इथल्या देशी संस्कृतीत जे काही करत होता ते किती चांगले होते ? ते सारे साम्राज्यवादी, भोगवादी किंवा भांडवलशाहीप्रणीत मधुकरवृत्तीपासून मुक्त होते काय ? वास्तविक ह्या तृष्णेच्या निरनिराळ्या अवस्था आहेत आणि त्या सर्वत्रच आढळतात.

पूर्वी प्रत्येक कलाकृती देशी होती. कारण सांस्कृतिक भिन्नत्व पराकोटीचे होते. वैद जाणिवेने हे भिन्नत्व नष्ट केले ह्याचा अर्थ सर्वच गोष्टी एकसारख्या आहेत असा अर्थ नाही. व्यक्तिपरत्वे कंडीशनिंग वेगळे असल्याने भिन्नत्व आहेच.

मला जाणवलेली एक गोष्ट अशी की, नेमाडे ज्याला देशी म्हणतात ते प्रत्यक्षात अवकाशाचे त्यातील तपशीलासह असलेले भान आहे. नेमाडे हा अवकाश देशी हा शब्द वापरून बद्ध करतात आणि तो अवकाश जणू स्वयंभू व वेगळा असल्याचे सांगतात. प्रत्यक्षात देशी संस्कृतीतील अवकाशात्मक तपशील मागेच सांगितल्याप्रमाणे देशी नसल्याचे सिद्ध केले आहे. मात्र जगातला प्रत्येक थोर लेखक ह्या अवकाशात्मक तपशीलाचे तपशीलवार भान राखून असतो; कारण माणसाचे कंडीशनिंग हे ह्या तपशीलावर अवलंबून असते. मात्र नेमाडे विवेचन करतात त्याप्रमाणे केवळ

कंडीशनिंगचे तपशील टिपणे हे कलावंताचे काम नव्हे, तर त्या तपशीलामागील विविध प्रेरणा, तृष्णा यांचा आवेग, वजन, पीळ, ठोकपणा, सूक्ष्मपणा, व्याप्ती, दृढपणा, लवचिकपणा यांचा आपापसातील संघर्ष व समायोजन आपापल्या माध्यमातून समर्थपणे मांडणे हे कलावंताचे काम आहे. शेक्सपिअरच्या काळी इतरही नाटककार होते तेही देशीच होते पण ते देशी तपशीलावरच थांबले. शेक्सपिअर मात्र त्या तपशीलाच्या आत असलेल्या प्रेरणा व तृष्णांच्या जंगलात खोल शिरला. व्यास तर शेक्सपिअरचाही बाप. त्याची व्याप्ती शेक्सपिअरपेक्षा प्रचंड आहे. थोडक्यात, कलाकृती वैश्विक ठरण्याची कारणे वेगळी आहेत. भोवतालच्या तपशीलांचे तपशीलवार भान हे केवळ त्यातील एक आहे. मात्र ते वैश्विकतेसाठी अनिवार्य आहे. मी शेक्सपिअरसारख्या दुसऱ्या संस्कृतीतील कलावंताच्या कलाकृतीला दाद देतो त्याचे कारण हे देशी तपशील नसतात, तर त्यामागच्या प्रेरणा व तृष्णा यांचे त्याने उभे केलेले जाळे असते. आधुनिक काळात हे तपशीलही देशी राहिलेले नसल्याने त्यांना अवकाशाचे तपशील म्हणणेच योग्य होईल. शिवाय लेखक हल्ली इतके विस्तारित होत चाल्लेत की अवकाशाच्या तपशीलाचे सत्वच ते मोजक्या तपशीलातून व्यक्त करतात. उदा. सॅम्युअल बेकेट याचे वेटिंग फॉर गोदो. अशा कलाकृतीत अवकाशाचे वजन सतत जाणवत राहते. मात्र हा अवकाश कुठल्याही काळी, कुठल्याही स्थानी अस्तित्वात असल्यासारखा उभा केला जातो. ह्याउलट पु. शि. रेगेंच्या कादंबऱ्यांत ह्या अवकाशाचे तपशीलवार भानही नसते किंवा वजनही नसते. ह्यातील पात्रांना कंडीशनिंग होणे हा प्रकार जणू ठाऊकच नसतो. तृष्णांचा संघर्ष ही पात्रे जगतच नाहीत. म्हणून ह्या कादंबऱ्या भुईसपाट होतात.

*देशीयतेविरुद्ध ठरलेला आक्षेप म्हणजे, मानव सर्व एक आहे असे असता इथले साहित्य आणि तिथले साहित्य हा भेद क्षुद्रपणाचा नाही काय ? 'उदारचरिताना तु वसुधैवकुटुंबकम्' असे हितोपदेशातील धूर्त कोल्हा गरीब हरणाला फसवण्यासाठी म्हणतोच. देशीयतेविरुद्ध दुसरा आक्षेप म्हणजे आक्रमक सनातनी राष्ट्रवादी लोक देशीयतेचा दुरुपयोग करू शकतात. असे भाबडे आक्षेप मान्य करूनही देशीयतेचे महत्त्व कमी होत नाही. मोठमोठ्या संस्कृती आणि राष्ट्रे परदेशातून परांगदा झालेल्या उपऱ्या लोकांनी स्थापिली आणि संगोपिली. ह्या उलट त्या त्या देशातील भूमिपुत्रांनीच स्वतःच्या संस्कृतीचा व राष्ट्राचा बिनदिक्कतपणे नाश केला, अशी उदाहरणे जगाच्या आणि महाराष्ट्राच्या इतिहासात भरपूर सापडतील. त्याचबरोबर अशीही उदाहरणे सापडतील की, काही लोक स्वदेशापेक्षा नवख्या दूरच्या प्रदेशांच्या प्रेमात पडलेली दिसतात. ह्या उलट तुकाराम-काफ्का ह्यांच्यासारख्या असंतुष्ट आत्म्यांना आपल्याच जन्मभूमीत आपण परके झाल्याचे जाणवते.*

*त्याचप्रमाणे स्वातंत्र्य, समता, बंधुभाव, न्याय, करुणा, अहिंसा अशी मूल्ये, तत्त्वे किंवा कल्पना एखाद्या समाजात जन्मतात आणि त्यांची बीजे दूरवर उडत जाऊन देशांतर करून दुसऱ्याच समाजात अधिक भक्कम मुळे धारण करून अधिक जोमाने वाढलेली दिसतात. अलीकडे राक्षसी प्रचार माध्यमांद्वारा आंतरराष्ट्रीय सहकाराचे इतके आवर्जून कौतुक केले जाते की, रोज पेपर वाचणाऱ्यांना व टीव्हीसमोर बसणाऱ्यांना देशीयता म्हणजे संकुचितपणा वाटण्याची शक्यता अधिक आहे. हल्लीच्या शास्त्रीय युगकल्पनांनी आणि वाढत्या संस्कृतिसंकरामुळे, तसेच अंतराळयुगाच्या स्पर्शाने, माणसांना ह्या पृथ्वी नामक ग्रहावर तरंगतेपणाची, संपूर्ण भूमिहीनतेची जाणीव करून दिली आहे. आणखी देशीयतेला फिके पाडणाऱ्या घटना म्हणजे गतिशील आक्रमक युरोपी संस्कृतींनी गरीब स्थितिशील अशा आफ्रो-आशियाई समाजांवर पूर्ण प्रभाव टाकून आपले श्रेष्ठत्व ह्या दडपलेल्या लोकांच्याच तोंडून वदवून घेतल्याने घडल्या. ह्या घटनांमुळे 'तिसऱ्या जगातल्या' लोकांची स्वतःच्या भूमीवरची श्रद्धा नाहीशी झाली. देशीपणा हे मागासलेल्या, बुरसटलेल्या मूल्यांचे तर तत्त्वज्ञान नाही ना ? युरोपातली कुत्रीसुद्धा आपल्याकडील माणसांपेक्षा हुशार असतात काय ? अशा शंका 'तिसऱ्या' जगात निर्माण झाल्या. म्हणजे अमेरिकेतल्या पंचमहाभूतांना पूजणाऱ्या रेड इंडियनांना महत्त्व द्यावे, की आपल्या देदीप्यमान शास्त्रीय प्रगतीने तीच पंचमहाभूते पादाक्रांत करणाऱ्या युरोपी गोऱ्या लोकांचे कौतुक करावे ? जगभर साम्राज्य प्रस्थापित करणाऱ्यांची गाथा गायची सोडून आपापल्या परिसरात आनंदाने जगत आपोआप म्हाताऱ्या होणाऱ्या वसाहतींमधील गरीब ग्रामसंस्कृतींची महती गावी काय ? सगळा आसमंत हादरवून टाकणाऱ्या विस्तारशील, आक्रमक, विराट सिंफन्या कुठे आणि आपल्या जंगलातल्या वेळूचा पावा जीव ओतून वाजवणारा फाटका गुराखी कुठे !*

*ब्रांझयुगापासून क्रूर कत्तली हेच निर्णयाचे मूल्य मानणाऱ्या पृथ्वीवरील मानवी संस्कृतीत वरील प्रश्नांची उत्तरे मिळणे फारच सोपे आहे.*

वरील विवेचनावरून नेमाडेंना वैद (वैश्य आणि दलित) जाणिवांचा पडत चाललेला वाढता प्रभाव लक्षात आलाय हे सहज लक्षात येते. पण वैद जाणीव ही परकी मानल्याने, त्या जाणिवा ज्यांनी बाळगल्या त्यांनी इतरांना गुलाम केल्याने त्यांना ती स्वीकारणे जड जाते आहे. दुर्दैवाने नेमाडेंसारख्यांनी कितीही गळा काढला तरी फाटका गुराखी नाहीसा होणे अटळ आहे. मात्र त्याचा पावा सिंफनीचा एक भाग म्हणून सामावून घेतला जाईल. वैद जाणीव युरोपकेन्द्री आहे म्हणून अमान्य करण्यात अर्थ नाही. प्राचीन काळी भारत ब्राह्मण जाणिवेचा सर्वात आधुनिक केंद्र

होता. त्यामुळेच भारतीयांचे आशिया खंडातील धार्मिक जाणिवांचे आक्रमण सर्वच प्रदेशांनी सामावून घेतले. हीच गोष्ट युरोपमध्ये इस्राईलबाबत घडली. आज हे केंद्र अमेरिका, जर्मन आणि जपानकडे सरकलंय. आपण त्याला शह देऊ शकतो, पण त्यासाठी क्षत्रिय जाणिवेतून आलेला देशीवाद फेकून द्यायला हवा. आंतरराष्ट्रीय वैद जाणिवेत महत्त्वाचे योगदान द्यायला हवे. जपानने हे करून दाखविले आहे. भारताला ते अशक्य नाही; पण देशीवादासारख्या गांडू पलायनवादी चळवळींना आपण विरोध करायला हवा. तरच आपल्याला भवितव्य आहे. विधवा धंदा करायला लागल्या म्हणून सतीची चाल पुन्हा आणण्यात काय अर्थ आहे ?

*संस्कृती म्हणजे परस्पर सहकार्य करणाऱ्या अनेक व्यवस्थांचे जाळे असते. बाहेरून पडणारे सर्व प्रभाव ह्या व्यवस्थांमध्ये रूपांतरित करून त्यांना आत्मसात करण्याची अंगभूत शक्ती प्रत्येक जिवंत जोमदार संस्कृतीमध्ये असते. बाहेरील प्रभाव आत्मसात करण्याच्या ह्या प्रक्रियेला देशीकरण म्हणता येईल. ही देशीकरणाची प्रक्रिया जितकी सक्षम असेल तितकी ती देशी संस्कृतीला पोषक ठरते. बाहेरून आदळणाऱ्या विविध मूर्त आणि अमूर्त गोष्टींचे देशीकरण करून कोणत्याही जोमदार संस्कृतीचे पोत भक्कम होत जाते. ह्या प्रक्रियेमुळेच मानवबाह्य विश्वातील घटना, सचेतन व अचेतन वस्तू, प्राणी आणि वनस्पती इत्यादींना संस्कृती आपल्या पोटात घेत असते. ह्याच प्रक्रियेमुळे मानवी अस्तित्वाचे त्या त्या प्रदेशाशी, तिथले डोंगर, नद्या, प्राणिजात, इतिहास व भूगोल ह्यांच्याशी जन्मजात नाते प्रस्थापित होते.*

*साहित्याच्या परंपरेत ही देशीकरणाची प्रक्रिया अव्याहतं चालू असते. प्रत्येक नव्या साहित्यिकाला आपली मुळे ह्या परिसराभिमुख परंपरेत खोलवर रोवलेली असल्याचे आपोआप जाणवते. परसंस्कृतीशी संपर्क झालेल्या लोकांच्या जाणिवेत वा नेणिवेत परसंस्कृतीतील नवी मूल्ये, तत्त्वे एवढेच नव्हे तर मोठमोठ्या सांस्कृतिक व्यवस्थासुद्धा आत्मसात केल्या जातात. हिंदुस्थानात आर्य, हूण, शक, मोगल इत्यादींचे असेच देशीकरण झाले. उसनवारी करतानासुद्धा परक्या समाजाचा कितीही तीव्र सांस्कृतिक व राजकीय दबाव असो, कोणते परके मूल्य किंवा तत्त्व घ्यावे ह्याची निवड सांस्कृतिक व्यवस्था अत्यंत काळजीपूर्वक करत असतात आणि ज्या गोष्टी समाजाची मूळ संरचना वाढविण्यासाठी आवश्यक असतात, अशाच परक्या गोष्टींना देशी व्यवस्थेत शेवटी स्थान मिळते. येथे संस्कृतिसंपर्काच्या गदारोळात पहिल्या पिढीची चूक झाली तर पुढच्या पिढ्या त्यात दुरुस्ती करून समतोल साधतांना दिसतात.*

*सारांश, आपली देशी संस्कृती छेदून त्या पलीकडच्या आंतरदेशीय महाव्यवस्थेत जाण्याची*

उलटी प्रक्रिया ही साहित्याची मूलभूत गरज नाही. पंचतंत्र किंवा अरबी भाषेतील गोष्टी किंवा शेक्सपिअर ह्या देशी साहित्यकृती इतर संस्कृतींनी आपली गरज म्हणून देशीकरणाच्या प्रक्रियेने आत्मसात केल्या. तरीही त्या त्या साहित्यकृतीचे मूळ अस्तित्व देशीच राहाते. काही थोर ग्रंथांना सबंध विश्वसाहित्यात मानाचे स्थान प्राप्त झालेले दिसते. प्रचाराचा आणि कमीजास्त लोकप्रियतेचा भाग सोडल्यास होमर, सोफोक्लीस किंवा व्यास, वाल्मीकी वगैरे प्रत्येक भाषेतील जुने-नवे थोर ग्रंथ कुणालाही मान्य करावे लागतात, इतके देदीप्यमान असतात. परंतु येथेसुद्धा जणू काही विश्वसाहित्याची एक कोठी असून, किल्ल्या प्रबळ पाश्चात्त्य भाषांतील लोकांच्या ताब्यात असल्याचे भाबडे मराठी लोक मानतात. गेल्या शंभर वर्षातील मराठी समीक्षेचा आढावा घेतल्यास टेनिसन-ब्राऊनिंगपासून एलिअट-बेकेट अशा त्या मानाने दुय्यम दर्जाच्या साहित्यिकांची थोरवी मानणारे भाबडे मराठी विद्वान भीतभीतच तुकारामाची विश्वसाहित्यात गणना करताना दिसतील. पंचतंत्र, उपनिषदे, रामायण, महाभारत, कथासरित्सागर, गाथासप्तशती, भर्तृहरी, कालिदास, शूद्रक, विशाखादत्त, दंडिन्, बाण आणि नंतर आधुनिक भाषांमधील म्हाइंभट, नामदेव, ज्ञानदेव, जनाबाई ह्यांच्या तोडीचे (आपल्याला माहीत नसलेले) कितीतरी साहित्यिक आपल्या साहित्यचर्चेत क्वचित आढळतात. देशीपणाची जाणीवच नाहीशी झाल्याची ही अज्ञानमूलक लक्षणे आहेत.

वरील मराठी भाबडेपणा बाजूला ठेवून असे म्हणता येईल की, युरोपी वा अमेरिकन साहित्यातील थोर ग्रंथ हे खऱ्या अर्थाने देशीच आहेत. त्यांना जगभर वाचकवर्ग मिळतो. ही घटना एका देशी संस्कृतीला इतर देशी संस्कृतींनी दिलेली दाद होय. विश्वसाहित्यातील अक्षरग्रंथ हे आपल्या देशीपणाचा हक्कच प्रस्थापित करीत असतात. कोणत्याही जबरदस्त देशी साहित्यकृतीची मुळे आपापल्या भूमीत खोलवर रुजलेली असतात. स्थलकालाच्या मर्यादा ओलांडण्यासाठी त्यांना दुसरे काहीही करावे लागत नाही. इतर स्थलकालांनीच त्यांच्यापर्यंत पोहोचावे लागते. ह्या तुलनेत अमेरिकन पुस्तकांची यूसिसने करवून घेतलेली मराठी भाषांतरे पाहावीत.

नेमाडे इथे जे म्हणत आहेत ते प्राचीन काळी सत्य होते. आता मात्र देशीकरणाची जागा आयात-निर्यातीने घेतली आहे. ज्याला ज्या वस्तू, ज्या संकल्पना, जे विज्ञान, जे मूल्य आयात करावेसे वाटते तो ते आयात करतो. ज्याला जे निर्यात करावेसे वाटते तो ते निर्यात करतो. एकप्रकारची उपयुक्ततेची कसोटी लावली जाते. कलावंतही त्याला उपयुक्त वाटेल असे तंत्र आयात करतो व स्वतःच्या व्यक्तिमत्त्वात सामावून घेतो. जगातल्या ज्या साहित्यकृतींची उदाहरणे

नेमाडेंनी दिली आहेत त्या साहित्यकृती वैश्विक होत्या. त्याची कारणे मागे दिलीच आहेत. एकमेकांच्या साहित्यकृतींना जी दाद दिली जाते ती त्या साहित्यातील खोलीवर अवलंबून असते. इलियट-बेकेट ह्या वैश्य जाणिवा व्यक्त करणाऱ्यांना नेमाडेंनी दुय्यम मानलंय. ब्राह्मणी आणि क्षत्रिय जाणिवा व्यक्त करणाऱ्यांना श्रेष्ठ मानलंय. ह्यात फारसे आश्चर्य करण्याचे कारण नाही. नेमाडे वैश्य जाणिवेला किती पारखे आहेत एवढेच त्यातून कळते.

*वेगवेगळ्या काळात एखाद्या प्रदेशातले साहित्य विश्वसाहित्याच्या केंद्रस्थानी असल्याचे दिसून येते. त्या विशिष्ट ऐतिहासिक युगात असे वाङ्मयीन पर्यावरण निर्माण होते की, एका ठराविक प्रदेशातील समूहाच्या जाणिवा जगभरच्या एकूण मानवी समाजाचे नेतृत्व करीत असतात. आम्ही इतिहास बनवत आहोत, अशी देहभान हरपून टाकणारी जाणीव अशा समाजात पसरते. त्यामुळे त्या प्रदेशातील संवेदनशील प्रतिभावंतांच्या साहित्यकृती आपोआपच त्या युगातील मानवी जाणिवांना सर्वसाधारणतः मध्यवर्ती ठरतात. विशिष्ट ऐतिहासिक परिस्थितीमुळे अशा साहित्यकृती त्या युगातील जनतेच्या जाणिवांचा संकेतकोश म्हणून कार्य करतात. उदाहरणार्थ, पंधराव्या शतकातील इटालियन, एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील इंग्रजी आणि त्याच शतकातील उत्तरार्धातील रशियन व फ्रेंच साहित्य. ह्या साहित्यात त्या त्या युगात व्यक्त झालेल्या जाणिवा इतर समाजांनाही संदर्भचौकटी म्हणून वापरता येतात. नंतरच्या युगांतही त्यांचे मध्यवर्तीपण टिकून राहिले. विश्वसाहित्याची स्थलकालातीत कल्पना ह्यातून पुढे आली. इतर देशांत त्यावेळी कितीही मोठमोठे साहित्यिक लिहीत असले तरी अशा देशांमधल्या ऐतिहासिक परिस्थितीत निर्माण होणाऱ्या जाणिवा त्या युगातील जनतेला मध्यवर्ती संदर्भस्थानी ठरल्या नाहीत. भारतीय साहित्यातसुद्धा अशी देदीप्यमान युगे येऊन गेली. नंतर काळ बदलला आणि मानवी जाणिवांचे केंद्रस्थान अन्य साहित्यात गेले. असे झाले तरी पूर्वीच्या अशा काळातल्या मध्यवर्ती साहित्याला किमान ऐतिहासिक महत्त्व तरी उरतेच.*

*अर्थात हे चित्र स्थूलमानाने दाखविले आहे. प्रत्यक्षात जगभर त्या त्या प्रदेशात पुन्हा अशी लहानमोठी मध्यवर्ती केंद्रे प्रस्थापित होत असतातच. उदाहरणार्थ, भारतीय प्रदेशात विसाव्या शतकाच्या सुरुवातीला बंगाली साहित्यिक जाणिवा मध्यवर्ती ठरल्या. जगातल्या एकूण मानवी जाणिवांच्या परिघात अर्थातच त्या केंद्रस्थानी जाणे शक्य नव्हते. एकोणिसाव्या शतकातील रशियन कादंबरीकार त्या काळात मध्यवर्ती ठरले नाहीत, पण नंतर ते केंद्रस्थानी आले. विश्वसाहित्याच्या संकल्पनेत अशा अनेक प्रक्रिया घडत असतात. परंतु प्रत्येक प्रक्रियेत देशीपणाचा*

*घटक प्रमुख असतो. विश्वसाहित्याखालील अधःस्तरांचे निरीक्षण केल्यावर हे लक्षात येते.*

वरील निरीक्षणे बरोबर आहेत. फक्त वैद जाणिवांतील विकासाचे ते टप्पे आहेत एवढेच सांगावेसे वाटते. वैज्ञानिक वैश्य जाणिवांची प्रतिष्ठापना व त्याला झालेला रोमॅन्टिक विरोध हे इंग्लंडचे, वैश्य अस्तित्वाचे गतिशीलत्व हे फ्रेंचांचे तर वैश्य व ब्राह्मण, क्षत्रिय जाणिवांतील संघर्षाचे ताणेबाणे हे रशियन साहित्याचे विशेष होते. विसाव्या शतकातील आशिया, आफ्रिकेला ते जास्त जवळचे होते. भारतात वैश्य जाणीव प्रथम बंगालमध्ये आली. त्यामुळे ते भारतीय साहित्याच्या केंद्रस्थानी आले. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य जाणिवांचे संघर्ष व समायोजन त्यात दिसते.

*देशी संदर्भ नसलेले पण मुळातच 'आंतरराष्ट्रीय साहित्य' असे काही स्वतंत्रपणे अस्तित्वात नसते. तौलनिक साहित्य-विचारातसुद्धा असे आंतरराष्ट्रीयत्व मानले जात नाही. तिथे तुलना करण्याची जी विशिष्ट पद्धत असते, तिच्यानुसार एका देशी शैलीची, चळवळीची किंवा वृत्तीची दुसऱ्या देशी शैलीशी, चळवळीशी किंवा वृत्तीशी तुलना केलेली असते. ही शिस्त न पाळल्यास, म्हणजे त्या त्या साहित्यकृतीचे देशीपण टाळून तुलना केल्यास हा प्रकार क्षुद्राभ्यासापलीकडे जात नाही. वैश्विक अशा वाङ्मयीन व्यवस्था नसतात, हे तौलनिक साहित्यतज्ज्ञ नेहमीच सांगतात. सैद्धान्तिकदृष्ट्यासुद्धा देशीयतेचा पाया नसलेली आंतरराष्ट्रीयता ही संकल्पनाच असंभाव्य ठरेल. कारण देशीयता ही बहुकेंद्री, वर्णनपर आणि प्रत्यक्ष अशी संकल्पना आहे, तर आंतरराष्ट्रीयता कृत्रिम आणि परजीवी संकल्पना आहे. देशीपणा ही गुणात्मक संकल्पना नसून ते एक सामान्य आणि अपरिहार्य तत्त्व मानले पाहिजे. कारण देशीपणाचे तत्त्व विशिष्ट संस्कृतीने निर्मिलेल्या बऱ्यावाईट लहानमोठ्या सर्व प्रकारच्या कृतींमध्ये प्रकट झालेले दिसते.*

इथे मी फक्त देशीयतेऐवजी व्यक्तिगतता हा शब्द सुचवेन आणि ह्या व्यक्तिगततेचे सरासरी प्रमाण म्हणून देशीयता व देशीयतांचे सरासरी प्रमाण म्हणजे आंतरराष्ट्रीयत्व असे म्हणेन. व्यक्तिगतता हीच बहुकेंद्री वर्णनपर प्रत्यक्ष अशी संकल्पना आहे. देशीयता काय किंवा आंतरराष्ट्रीयता काय, दोन्हीही परजीवी व कृत्रिम संकल्पना आहेत.

*देशीपणाचे तत्त्व साहित्यात पुरेसे स्पष्टपणे उमटलेले आढळले, तरी साहित्यचर्चेत या संकल्पनेबद्दल फारसा विचार झालेला दिसत नाही. ह्याचे कारण, अशी चर्चा युरोपात सुरू होणे अशक्य होते, आणि युरोपात सुरू झाली नाही म्हणून इकडेही सुरू होणे अशक्य होते. तथापि जगातल्या प्रत्येक देशीपणाला मध्यवर्ती स्थान दिलेले आहे असे कालखंड सर्वत्र सापडतात*

आणि अशा कालखंडात त्या देशाचे वाङ्मय जोमाने बहरलेले दिसते. उदाहरणार्थ, तेराव्या शतकातील मराठीतील यादवकाल, शिवकाल, किंवा इंग्रजीतील एलिथाबेथ युग किंवा रोमँटिक युग. देशीपणाचे निकराचे भान अशा युगात वाढते आणि देशीकरणाच्या प्रक्रियेत त्या काळातल्या सर्व लेखकांची सर्जनशक्ती कार्यरत झालेली दिसते.

भाषाशास्त्र, शैलीशास्त्र, पुरातत्त्ववेत्ते, मानववंशशास्त्रज्ञ आणि कलेचे इतिहासकार स्पष्टपणे सांगतात की, प्रत्येक कालखंडात आणि प्रत्येक प्रदेशात स्पष्टपणे वेगळी अशी कला, साहित्य आणि एकूण सर्वच मानवी व्यवहारांमध्ये आढळते. कोणती कलाकृती कोणत्या प्रदेशात आणि कोणत्या कालखंडात निर्माण झाली हेही देशीयतेच्या तत्त्वावर अचूकपणे ठरविता येते. आपल्या देशातील प्रदेशविशिष्ट संगीत, चीजा, धुना, गायकी ह्या तर गाणे ऐकल्यावर कोणत्या प्रदेशातल्या हे सांगता येते. भाषेचे स्वरूप तर इतके सूक्ष्मपणे देशकालविशिष्ट असते की, तिच्यातल्या साहित्यकृतीचा काल आणि स्थळ ठळकपणे उभी राहतात. ज्या अर्थी साहित्यकृती फक्त भाषेतच व्यक्त होते, त्या अर्थी भाषेचे ऐतिहासिक, भौगोलिक आणि सामाजिक संदर्भ साहित्यकृतीच्या भाषिक शैलीगुणांवर अदृश्यपणे हुकमत ठेवत असतातच. शैलीची वैशिष्ट्ये ही तर साहित्यकृतीची खाण कोणती हे स्पष्टपणे दर्शवितात. येथे साहित्यकृतीचे आपल्या सांस्कृतिक आवरणाशी असलेले जन्यजनक नाते मुद्दाम स्पष्ट करण्याची गरज नाही. महाभारत प्राचीन हिंदुस्थानातच का निर्माण होऊ शकले हे देशीपणाच्या तत्त्वानेच स्पष्ट होते. ही पद्धती म्हणजे वेगवेगळ्या जंगली प्राण्यांच्या आपापल्या नैसर्गिक परिसराशी जोड्या लावण्याइतकी सोपी आहे.

दुर्दैवाने इतका सोपा विचार साहित्याच्या दुर्बोधत्वाची सवय लागलेल्या आपल्या लोकांना घाबरवून टाकतो. त्यातही आपल्या अभ्यासकांचा विश्वसाहित्याशी होणारा परिचय केवळ इंग्रजी भाषेतून होत असल्यामुळे जणू काही जगातील थोर साहित्य एका स्वतंत्र आंतरदेशीय प्रांतातच वैश्विक ठरते, असा गैरसमज भाबड्या मराठी अभ्यासकांचा होऊ शकतो.हा गैरसमज शहरी मुलांनी जिराफ, हत्ती, मोर, शहामृग यांना आपल्या महानगरातील प्राणिसंग्रहालयाशी जोडणे किंवा एस्किमो, बदाऊनी वा आदिवासी लोकांना एका टीव्हीच्या पडद्याशी जोडण्यासारखा आहे. हे आंतरदेशीयतेचे गैरसमज देशीयतेच्या यथार्थ ज्ञानाशिवाय नाहीसे होत नाहीत.

अवकाशाच्या तपशीलाचे भान, मग तो तपशील देशी असो की विदेशी, साहित्यात उमटते आहे. साहित्यात, विशेषतः मराठी साहित्यात खरोखरच ह्याची चर्चा झालेली नाही. युरोपात देशीवाद आला नाही हे म्हणणे खोटे आहे. ब्राह्मण जाणीव केंद्रस्थानावरून हलून क्षत्रिय जाणीव केंद्रस्थानी येण्याचे प्रकरण तिथेही घडून आले होते. फक्त त्याला राष्ट्रवादाची शास्त्रशुद्ध

बैठक मिळाली. कळीतून फूल उमलावे तसे हे परिवर्तन तिथे घडलेले दिसते. भारतात व इतर वसाहतींतही वैश्य जाणिवेचे आक्रमण होईपर्यंत क्षत्रिय जाणीव केंद्रस्थानी यायला तयार नव्हती. (शिवाजी व अकबर हे अपवाद). त्यामुळेच भारतीय राष्ट्रवादाला एकाच वेळी वैश्य जाणीव व क्षत्रिय जाणीव केंद्रस्थानी आणणे व ब्राह्मण जाणीव केंद्रापासून हटविणे व हे करता करताच आपल्यातल्या क्षत्रिय जाणिवेचे नवे सिद्धांतन करून प्रतिवैश्य जाणीव निर्माण करून इंग्रजांना हाकलून लावणे अशी दुहेरी कसरत व कामगिरी पार पाडावी लागली.

एकीकडे इंग्रजांना हाकलण्यासाठी जाज्वल्य क्षत्रिय जाणिवेची निर्मिती तर दुसरीकडे ब्राह्मणी जाणिवेचा पाडाव करण्यासाठी वैश्य जाणिवेची उभारणी अशा दुहेरी टॅक्टिस तत्कालीन विचारवंतांनी अवलंबल्याचे दिसते. हे करताना भारतातील अवकाशाचे तपशील पुन्हा नव्याने मांडणे गरजेचे बनले होते. त्यामुळेच ज्याला नेमाडे देशीवाद म्हणतात त्याची सुरुवात एकोणिसाव्या शतकात झाली होती. खरे सांगायचे तर भारतात ह्याचवेळी देशीवाद मांडला जायला हवा होता. कारण वैश्य जाणिवेचे सर्वंकष आक्रमण त्या काळात झाले नव्हते. यादवकाळात असो किंवा शिवकाळात असो, त्या त्या काळातील कलावंतांनी त्यांना ज्ञात असलेला भूमिनिष्ठ अवकाश त्यातील तपशीलासह प्रकट केला. त्यामुळे नेमाडे म्हणतात ते त्या काळासंदर्भात योग्य वाटते. आज मुळातच अवकाश देशी राहिलेला नाही. जगातील सर्व तपशीलांनी तो व्याप्त आहे. ज्ञानेश्वरांच्या काळी मुळातच ही अवस्था अस्तित्वात नव्हती, अन्यथा ज्ञानेश्वरांनी अवघे विश्व ज्ञानेश्वरीत आणून सोडले असते. व्यास आणि वाल्मिकींनी त्यांना ज्ञात असलेल्या सर्व भूगोल आणि अवकाश त्यातील तपशीलासह प्रकट केलेला दिसतो. तेव्हा नेमाडे म्हणतात त्याप्रमाणे देशी नव्हे तर ज्ञात असलेला अवकाश आणि त्या अवकाशाचे निकराचे भान मराठीतील यादवकाल, शिवकाल, एलिझाबेथ युग किंवा रोमँटिक युग ह्यांच्यात दिसते. बखरकाळातील फारसी शब्दांचे तपशीलही हा मुद्दा सिद्ध करायला पुरेसे आहेत. (स्वतःला ज्ञात नसलेला अवकाश कादंबरीत आणण्याच्या अट्टाहासापायी मराठी कादंबरीत बेदिली माजली. ना. सी. फडक्यांपासून पु. शि. रेग्यांपर्यंत अवकाशातील तपशीलाचे भान कुणालाच नसल्याने मराठी कादंबरी पचपचीत झाली आहे. ज्ञात अवकाश जिथे धड व्यक्त करता येत नव्हता तेथे काफ्का किंवा बेकेटसारखा अवकाश तासत तासत नेऊन शुद्ध अवकाशापर्यंत नेणे मराठी कादंबरीकारांच्या कुवतीबाहेरचे होते. खानोलकर आणि श्री. ना. पेंडसे ह्या दोघांनीही सत्यकथेच्या नादाला लागून अवकाश अनुक्रमे सिम्बॉलिक किंवा रोमँटिक करून आपल्या कादंबऱ्यांची रयाच घालविली. खानोलकरांना आपण नेमके काय सिम्बॉलाईज करतो आहोत हे कधीच कळले नाही. त्यासाठी लागणारे प्रगल्भ वैचारिक व्हिजन

त्यांच्याजवळ नव्हते. त्यामुळे ते अवकाश केवळ चाचपत राहिले. 'चानी'सारख्या कादंबरीत तो थोडाफार सापडला. पण एरव्ही विहिरीत पोहण्याची सवय नसलेल्या माणसाने समुद्रात उडी मारताच गटांगळ्या खाव्यात तसे खानोलकर त्यांच्या अनुभवांच्या समुद्रात गटांगळ्या खात राहिले. अस्तित्वाच्या विघटनाचा खानोलकरांना लागलेला शोध फार महत्त्वाचा होता. (हाच शोध नेमाडेंनाही लागला होता.) पण नेमाडेंच्याजवळ असलेली बौद्धिक क्षमता खानोलकरांजवळ नसल्याने त्यांना एकही चांगली कादंबरी निर्माण करता आली नाही. वैश्य जाणिवेचे कच्चे आकलन आणि ब्राह्मण जाणिवेने घातलेला विळखा ह्या दोन्ही गोष्टी ह्याला प्रामुख्याने जबाबदार होत्या. खानोलकरांजवळ नेमाडेंसारखीच विलक्षण प्रतिभा होती. पण वर उल्लेख केलेल्या गोष्टी आणि शिस्तीचा अभाव ह्यामुळे त्यांची प्रतिभा वाया गेली. ह्यातच त्यांच्या बेशिस्तीचेच कौतुक करणारे मूर्ख सहकारी आणि विचारवंत त्यांना भेटले. खरं तर श्री. पुं. नी त्यांना ह्याबाबत फटकारायला हवे होते, पण कलावंताचे स्वातंत्र ह्या गोंडस संकल्पनेखाली खानोलकरांना आवर घातला गेला नाही. परिणामी चांगल्या क्षमता असलेला प्रतिभावंत करपून गेला.

एकीकडे खानोलकर तर दुसरीकडे जी. ए. ! जी. एं. ना अवकाशाचे प्रखर भान होते. अवकाशाच्या सूक्ष्म तपशीलनोंदी हे त्यांच्या कथांचे एक मुख्य वैशिष्ट्य. पण दुर्दैवाने जी. एं. ना ग्रीक आणि ब्राह्मण जाणिवेने चांगलाच विळखा घातला. त्यातच ज्या धारवाडमध्ये ते राहात होते त्याच्या आसपास वैश्य जाणीव वावरत असली तरी ती पुरेशी पक्व झाली नव्हती. परिणामी जी. एं. नी ही जाणीव पुस्तकांतून प्राप्त करून घेतली. त्यांना ह्या जाणिवेतून निर्माण झालेले प्रश्न जाणवले होते. पण त्यांनी त्यामागची शोधलेली कारणे पलायनवादी होती. त्यांनी नियतीवादासारखी भयंकर कारणे सुचविली. ब्राह्मण जातीत जन्मल्याने आणि ब्राह्मण जाणिवेतून मोकळे न झाल्यामुळे जी. ए. दंतकथांच्या काल्पनिक अवकाशातून आजचे वास्तव प्रश्न मांडत राहिले. परिणामी मोठ्या लोकांचा चांदोबा हेच त्यांच्या कथांचे मुख्य खरे स्वरूप राहिले. मात्र जी. एं. ची अवकाशावरील मांड ही अतिशय पक्की होती. खानोलकरांसारखे ते बेशिस्त नव्हते. खरे तर खानोलकर ज्या स्कूलचे ग्रॅज्युएट होते त्याचे पोस्टग्रॅज्युएट जी. ए. कुलकर्णी होते. ते खऱ्या अर्थाने मास्टर ऑफ आर्ट्स होते. खानोलकर मात्र शेवटपर्यंत बॅचलरच राहिले. नेमाडे म्हणतात तसे पु. शि. रेगे अंडरग्रॅज्युएट व खानोलकर पोस्टग्रॅज्युएट असे नाते कधीच नव्हते.

रेग्यांची दृष्टी ह्या दोघांपेक्षा पूर्ण वेगळी होती. खरे तर वैश्य जाणिवेचा मागमूसदेखील रेग्यांच्यात आढळत नाही. (कदाचित् म्हणूनच नेमाडेंना रेगे कवी म्हणून एवढे आवडत असावेत.) ह्या जाणिवेतील प्रश्न मग फारच दूर राहिले. पु. शि. रेग्यांचे विश्व हे ब्राह्मणी जाणीव व क्षत्रिय

जाणीव यांच्या अध्यात्मप्रवण शांतरसाने व्याप्त आहे. एका अर्थाने रेगे खरे देशीवादी आहेत. रेग्यांची सर्व पात्रे ही सातव्या शतकातील राजे-राजवाड्यातील समजूतदार पात्रे आहेत. त्यांना ऐहिक चिंता नाहीत, मानसिक विवंचना नाहीत. ह्या लोकांचे फावल्या वेळचे उद्योग म्हणजे रेग्यांच्या कादंबऱ्यांतील घटना. आता अशा घटना आणि अशी पात्रे निवडल्यावर आणि ती आधुनिक काळातील अवकाशातून मांडायचे ठरवल्यावर त्या अवकाशाचे काय होणार ? एकीकडे जी. ए. कुलकर्णी आधुनिक पात्रे दंतकथांच्या अवकाशातून उभी करत असताना, दुसरीकडे पु. शि. रेगे दंतकथांतील पात्रे आधुनिक अवकाशातून व्यक्त करीत होते. हा विरोधाभास मराठी साहित्याच्या इतिहासात नोंद घेण्यासारखा आहे. ह्याचवेळी खानोलकरही आपली आधुनिक पात्रे घेऊन ग्रामीण अवकाशात पळ काढत होते हेही ह्या पार्श्वभूमीवर नोंद घेण्याजोगे आहे आणि ह्याच पार्श्वभूमीवर ग्रेससारखा कवी आधुनिक संवेदनशीलता व्यक्त करायला ग्रामीण आणि दंतकथात्मक अवकाशाची कशी भेसळ करीत होता हेही पाहण्यासारखे आहे. हे चारही कलावंत वैश्य जाणिवेला भिडण्याऐवजी पळ काढताना दिसतात. कारण चौघांनाही वैश्य जाणीव समजून घ्यायची नाही. ह्यातील ग्रेस आणि जी. ए. पुस्तकांतून प्राप्त झालेल्या अवकाशावर गुजराण करताना दिसतात. परिणामी जिथे पावसाचा पत्ता नाही अशा प्रदेशात राहूनही ग्रेस बर्फाळ कविता आणि बर्फाळ अनुभव मांडत राहतात, तर जी. ए. कधी इराणी, कधी ग्रीक, कधी युरोपियन अवकाशात राजपुत्र आणि डार्लिंगांना भटकवत बसतात. ह्या दोघांच्या कलांमधला अवकाश म्हणजे ट्वेन्टीथ सेंचुरी फॉक्स, एम. जी. एम., युनिव्हर्सल वगैरे पाश्चात्त्य कंपन्यांनी काढलेल्या प्राचीन व मध्ययुगीन कथांवरील सिनेमास्कोपिक चित्रपटांतील अवकाशाची पस्तीस एम. एम. उसनवारी वाटते. ज्यावेळी हे कलावंत आपल्याला ज्ञात असलेल्या अवकाशाच्या तपशीलातून अनुभव व्यक्त करतात तेव्हा समर्थ निर्मिती झालेली दिसते. जी. एं. ची 'हिरवे रावे', 'कैरी' वगैरे कथा किंवा ग्रेसचा 'ती गेली तेव्हा रिमझिम' सारख्या कविता, पु. शि. रेगेंच्या कविता, खानोलकरांची अधलीमधली चानी.

ह्या सर्व गोष्टी इथे सांगण्याचे कारण नेमाडे म्हणतात तसा देशीपणाचा अभाव नव्हे, तर अवकाशाचे सशक्त ज्ञान नसल्याने कलाकृती फाफलतात. जर जी. ए. नी आधुनिक पाश्चात्त्य अवकाश निवडून कथा अवकाशाच्या अशा सशक्त तपशीलासह लिहिल्या तर जी. ए. केवळ देशीवादी नाहीत म्हणून त्यांना महान म्हणणे नेमाडेनी नाकारले असते काय ? मला वाटते देशीवाद नव्हे तर अवकाशवाद ही कसोटी हवी असते आणि ह्या अवकाशाचे निकराचे भान जिथे दिसते तिथे वाङ्मय बहरलेले दिसते. मात्र केवळ अवकाशाचे भान ही कसोटी पुरेशी नाही हेही

इथे जाता जाता पुन्हा एकदा सांगायलाच हवे.

कुठलेही वेगळेपण हे व्यक्तिगत असते. नेमाडे हा वेगळेपणा फक्त प्रदेश आणि कालखंडात पाहतात आणि थांबतात. वस्तुस्थिती नेमकी उलट असते. वेगळेपणाची सुरुवात व्यक्तीपासूनच होते, म्हणूनच समान कालखंडातील, समान प्रदेशातील कलावंतांत वेगळेपण आढळते. संगीत चीजा, धुना, गायकी ह्या केवळ प्रदेशाच्याच नव्हे तर व्यक्तीच्यांही वेगळ्या काढून दाखवता येतात. त्या कोणत्या व्यक्तीच्या ते सांगता येते. कुठलीही शैली ही त्या त्या व्यक्तीची अचिव्हमेंट असते. तिचे भौगोलिक, ऐतिहासिक, सामाजिक संदर्भ त्या व्यक्तीच्या कंडीशनिंगवर अवलंबून असतात. ग्रेस, खानोलकर, जी. ए., रेगे ह्या व्यक्तींची कंडीशनिंगची प्रक्रिया ही वेगवेगळी असल्याने हे एकाच काळातील कलावंत वेगवेगळे लिहितात. जी. ए. व ग्रेस ह्यांचा काल्पनिक भूगोल हा त्यांच्या कंडीशर्निंगमुळेच शक्य होतो. जी. ए. नी ग्रीक वाङ्मय वाचले नसते तर त्यांच्या साहित्यात असला भूगोल आलाच नसता हे उघड आहे. आधुनिक काळातील कंडीशनिंगची प्रक्रिया ही त्या विशिष्ट प्रदेशावर अवलंबून नसून संपूर्ण जगावर अवलंबून आहे. जगातील कोणकोणत्या गोष्टी तुमच्यापर्यंत पोहचतात आणि तुम्ही जगातील कोणकोणत्या गोष्टीपर्यंत पोहचता ह्यावर हे कंडीशनिंग अवलंबून आहे. पूर्वीसारखे वेगवेगळ्या जंगली प्राण्यांच्या आपापल्या नैसर्गिक परिसराशी जोड्या लावण्याइतपत ते सोपे नाही. नेमाडे सर्व काही सहज सोपे असल्याच्या थाटात लिहितात ते बरोबर नाही.

नेमाडेंनी ज्या आंतरदेशीयतेच्या गैरसमजाविषयी लिहिले आहे त्याला कारण आहे आपली दृष्टी. वैद जाणीव सर्व जगभर पसरत गेली आणि तिने देशादेशांतील सांस्कृतिक भिंती तोडायला आरंभ केला. देशादेशात दळणवळण शक्य केले. दुर्दैवाने ह्या आंतरदेशीयतेकडे बघण्याचा आपल्याकडील लोकांचा दृष्टिकोन हा ब्राह्मणीच राहिला. कारण साहित्याची मक्तेदारी प्राचीन काळापासून ह्याच वर्गाच्या हातात होती. ज्ञानाच्या किल्ल्या ह्याच वर्गाच्या हातात होत्या. ह्या वर्गाला पहिल्यापासूनच 'विश्व अनंत आहे, ब्रह्म सनातन आहे, पिंडी तेच ब्रह्मांडी, विश्वामित्राने प्रतिसृष्टी निर्माण केली, सृष्टी शून्यातून निर्माण झाली' वगैरे वगैरे सिद्धांतांची सवय होती. त्यांनी विश्वाऐवजी कलाकृती आणि विश्वामित्राऐवजी कलावंत अशी रिप्लेसमेंट केली आणि पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाच्या मखरात बसवून ती मांडली. कलाकृती ही पार्थिव गोष्ट आहे हे विसरून तिला अलौकिक स्वरूप देण्याची धडपड चालू होती. इंग्रजीतून त्याला पूरक जे जे होते त्याचा सढळ हाताने वापर केला. किंबहुना हे इंग्रजी ग्रंथ म्हणजे ब्राह्मण जातीचे नवे वेद होते. आणि शब्दप्रामाण्य ह्यांच्या हाडामासात रुजले होते. पूर्वी वेदातील कोटेशन वापरून हे लोक समाजाला झुलवायचे;

आता इंग्रजी ग्रंथातील कोटेशन वापरून हे लोक समाजाला चकित करू लागले. वाळिंबेसारखे लोक तर ही कोटेशन्स धडाधडा पाठ म्हणून दाखवायचे. कुठल्याही प्रश्नाला सरळ भिडणे ह्यांनी पूर्वीही टाळले होते. आता नव्या वेदांच्या साहाय्याने हाच प्रकार चालू झाला. कुठल्याही समाजाची अर्थव्यवस्था आयात आणि निर्यात ह्या दोन्हींवर अवलंबून असते. 'सांस्कृतिक अर्थव्यवस्था' ह्याला अपवाद नाही. ह्या लोकांना पूर्वीपासूनच आयात करायची सवय होती. नव्याने उत्पादन करण्याला खास भांडवलदारी वृत्ती अंगात मुरावी लागते. त्यासाठी वैश्य जाणीव हाडामांसात मुरावी लागते. केवळ ब्राह्मणी संकल्पनेत वाढलेल्यांना हे शक्य नव्हते. ह्यांनी आयुष्यभर पूर्वजांची उसनवारी करून दिवस काढले होते. त्यामुळे एकतर इंग्रजीतून आयात करायची किंवा इंग्रजीतून संस्कृत भाषेतील संचिताची निर्यात करायची हा उद्योग ह्यांनी चालू केला. स्वतः काही निर्माण करण्याची क्षमता ह्यांच्याजवळ नव्हती. त्यामुळेच ह्यांनी जी आंतरदेशीयता जोपासली ती फोफशी होती. ह्या लोकांनी फार प्राचीन काळापासून अवकाशाकडे पाठ फिरवली होती. ही परंपरा विसाव्या शतकातही चालूच राहिली. नेमाडे ह्या कारणांचा वेध घेत नाहीत; कारण पाश्चात्त्य देशीवादात ह्याचे विवेचन नाही. नेमाडे ह्यांचा देशीवादही परदेशी असल्याने त्यांना हे दिसत नाही. असो. सांगण्याचा मुद्दा इतकाच की, आंतरदेशीयता हा भ्रम नसून ती एक फॅक्ट आहे. केवळ विशिष्ट जातीला तिचे आकलन झाले नाही म्हणून त्या फॅक्टला झोडपत जाणे हे बरे नव्हे. जग नेमाडे म्हणतात तसे जंगल राहिले नाही. 'जंगले वाचवा' ही मोहीम सांस्कृतिक अर्थानेही महत्त्वाची आहे. कारण खरीखुरी जंगलेच नव्हे तर सांस्कृतिक जंगलेही आता झाडांच्या कापणीमुळे नष्ट होत चालली आहेत. वैद जाणिवेचा अजस्र करवत ही जंगले बेमूर्वत कापत सुटलाय. त्याला थांबवणे कुणाच्याच हातात नाही आणि हितावह नाही. पूर्वी जग म्हणजे एक अफाट जंगल होते. आता त्याची बेशिस्त बाग बनलीय. मरलीन मन्रोने एका मुलाखतीत म्हटले होती की, 'हे जग म्हणजे पिंजरे नसलेले प्राणिसंग्रहालय आहे.' नेमाडेंनी हे ध्यानात घेणे आवश्यक आहे. आधुनिक साहित्यातले प्रश्न हे बागेचे, तिच्या बेशिस्तीचे, जंगलातील थ्रिलच्या अभावाचे प्रश्न आहेत. नेमाडे त्यांना जंगलाचे कायदे लावून ते सोडवू पाहतात; पण ते तसे सुटणार नाहीत. नेमाडेंनी कितीही ओरडून सांगितले तरी आधुनिक संस्कृती ही एक प्राणिसंग्रहालय बनली आहे. फक्त तिच्यातील प्राणी कधी पिंजऱ्यात तर कधी पिंजऱ्याबाहेर, कधी शिस्तबद्ध तर कधी मोकाटपणे हिंडत आहेत. 'जोड्या जुळवा' सारख्या, ऑब्जेक्टिव प्रश्नासारख्या तिच्या समस्या सोप्य नाहीत. तिची प्रत्येक समस्या म्हणजे एक लांबलचक उत्तर अपेक्षित असलेली सब्जेक्टि प्रश्नपत्रिका आहे. नेमाडे ह्या प्राणिसंग्रहालयात त्यांच्या कादंबऱ्यांतील नायकाप्रमाणेच क्षत्रिय

जाणिवेची बंदूक घेऊन हिंडत आहेत, आदिवासींच्यात नाचत आहेत. पण नेमाडेबुवा, शिकारीचा तो थ्रिल, तो फील आता येणे नाही. ती जंगले नाहीशी झाली, ते राजे-रजवाडे नाहीसे झाले आणि त्या शिकारीही नाहीशा झाल्या. आता हाती उरलंय ते तुमच्या नायकाप्रमाणे ह्या प्राणिसंग्रहालयातल्या पिंजऱ्यामधली कोळीष्टकं झाडणं आणि तुमच्या दुर्दैवानं हे प्राणिसंग्रहालय आंतरराष्ट्रीय आहे. इथे प्राण्यांची, पिंजऱ्यांची, डॉक्टरांची, औषधांची आंतरराष्ट्रीय देवाणघेवाण चालू आहे.

नेमाडे पुढे म्हणतात,

*"आता काहीजण विचारतील, की साहित्यकृतीचे संदर्भ देशी ठरण्यासाठी केवढा देश अभिप्रेत असतो ? देशीयतेचा परिसर किती लहान किंवा किती विशाल असला म्हणजे देशी भान पुरेसे होईल ? भाऊ पाध्ये यांची मुंबईपुरती देशीयता चालू शकेल, की माडगूळकरांचा माणदेश अधिक बरा ? मग सबंध महाराष्ट्र का नको ? किंवा संपूर्ण पश्चिम भारत किंवा दक्षिण भारत असायला काय बाधा आहे ? आणि हा परीघ असा वाढवत वाढवत भारताच्या बाहेरही नेला तर काय बिघडेल ? आणि खरोखर जर कोणी योगीपुरुष 'हे विश्वची माझे घर' असे समजत असतील तर आपण ह्या घराच्या कोणत्या सोप्यात बसू ? देशीयतेच्या जाणिवेच्या अशा मर्यादा ठरवता येतील असे वाटत नाही. परिसराचा हा प्रश्न त्या त्या लेखकाच्या रोजच्या जगण्यातल्या संवेदनशीलतेच्या आलेखावर ठरेल. त्यामुळे अर्थातच भारतीय संस्कृतीच्या संदर्भात प्रस्तुत लेखाच्या पूर्वार्धात चर्चिलेले भौगोलिक आणि सांस्कृतिक सातत्य हे कोणत्याही लेखकाला नेहमीच आव्हान देणारे आहे. देशीपणा आशयसूत्रांनी कधीही भरून काढता येत नाही. शेवटी देशी असणे म्हणजे ह्या एकंदर भूमितत्त्वाचे भान, त्यातील सर्व जाती, वंशाचे समूह, संप्रदाय, धर्म, परंपरा, स्थलकालाचे उभेआडवे छेद या सर्वांसकट येणारे एकजिनसीपणाचे भान होय."*

इथे नेमाडे भूमीचा भौगोलिक विस्तार निश्चित करण्याचा प्रयत्न करीत आहेत. पण ही मर्यादा ठरवता येणे अशक्य आहे अशीही कबुली देत आहेत. ह्याचे कारण उघड आहे. मी मागे म्हटल्याप्रमाणे, व्यक्तिगतता हीच वस्तुस्थिती आहे आणि देश ही एक सरासरी प्रमाणावर आधारीत कायदेबद्ध संकल्पना आहे. खुद्द नेमाडेंना देशाच्या परिसरनिश्चितीसंदर्भात झक मारत लेखकाच्या रोजच्या जगण्यातील संवेदनशीलतेपर्यंत पोहचावे लागलेले आहे असे दिसते. देश ही वस्तुस्थिती मानणाऱ्या नेमाडेंचा हा सरळ सरळ पराभव आहे. पण नेमाडे ते मान्य करीत नाहीत. कुठल्याही कलाकृतीत अवकाश असतोच आणि ह्याची उणीव कशानेही भरून निघण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. पण हा अवकाश देशी असेल असे नाही. ऐतिहासिक कादंबरी किंवा कलाकृतीत तर हा

अवकाश लेखकाला कल्पनेनेच निर्माण करावा लागतो. इतिहासातून प्राप्त झालेले अवकाशाचे तपशील त्याला आधुनिक आशयसूत्रांनी संघटित करावे लागतात. नेमाडेंना प्रमाण मानायचे ठरवले तर रोजच्या जगण्यातील संवेदनशीलतेशी संबंधित नसलेल्या ऐतिहासिक कल्पनाप्राप्त अवकाशांना साक्षात नकार देऊन ह्या सर्व कलाकृती रद्दबातल ठरवाव्या लागतील. असे काही करणे चूक आहे असे सांगायला नकोच. आधुनिक जगातील अवकाशात ज्याला देशी म्हणावे असे काही राहिलेले नाही हे मागेच सिद्ध केले आहे. त्यामुळे देशी असणे ह्या गोष्टीला फारसा अर्थ राहिलेला नाही. त्या त्या अवकाशातील माणसे, समूह, परंपरा, चालीरीती, शासन व कायदा, धर्म, अर्थव्यवस्था वगैरे वगैरे सर्वच गोष्टींचे भान त्या त्या कलावंताला सांभाळावे लागते; किंबहुना त्याचे भान निकराचे असावे लागते. मात्र ह्या सर्व गोष्टींना तासत तासत अवकाशाच्या सर्वव्यापी तपशीलातून 'वैश्विक सिच्युएशन' निर्माण करणे अवघड नाही हेही इथे सांगावेसे वाटते. सॅम्युअल बेकेट यांच्या वेटींग फॉर गोदोमध्ये वेटींग ही सिच्युएशन आणि वेटींगची जागा हा अवकाशाचा तपशील ह्यांचा वजनदार वापर करून एक यशस्वी कलाकृती निर्माण करण्यात आली आहे. भविष्यात निर्माण होऊ घातलेले आकाशातील विश्व हे तर नेमाडेंच्या तथाकथित भूमितत्त्वांना पूर्ण पारखे असणारे विश्व आहे. तिथे अवकाशाचे भान व व्यक्तींची कंडीशनिंगची प्रक्रिया हे दोनच घटक महत्त्वाचे ठरतील.

*"दुर्दैवाने जगात क्वचित पडले असतील असे प्रदीर्घ शतकांचे परक्या संस्कृतीचे दबाव, वसाहतवादी गुलामगिरी, स्वातंत्र्योत्तर चालूच राहिलेली परसंस्कृतिपूजा, नव्याने निर्माण झालेले संस्थात्मक केंद्रीकरण, नवस्थापित भाषावार प्रांतरचनेमुळे लोकांमध्ये असलेला अनाठायी एकभाषिक उन्माद, अल्पसंख्याक समूहांचे नव्या लोकशाहीत कमी झालेले महत्त्व ह्या सर्व गोष्टींमुळे तामिळनाडूपासून सिंध-आसामपर्यंत हळुहळू बदलत जाणारी भाषांची आणि एकाच संस्कृतीच्या भेदांची सलग साखळी आपल्या जाणिवेतून नाहीशी होत चालली आहे. विशेषतः आपली मुळे हरवून बसलेल्या आंग्लशिक्षित उच्चवर्णीयांचा सर्व समाजावरील दबाव आपल्यापुढे एकप्रकारची कृत्रिम आंतरराष्ट्रीयता आदर्श म्हणून ठेवीत असतो. त्यामुळे आपल्या राष्ट्रीय जीवनात कुठेही देशी घटक विचारात घेतला जात नाही. साहित्यविचारातसुद्धा त्यामुळेच देशी घटकांचा विचार होत नाही.*

*मानववंशशास्त्रीय अभ्यासात देशीपणाचे तत्त्व कोणत्याही जिवंत समाजाच्या अस्तित्वाचे गमक म्हणून गृहीत धरले जाते. कोणत्याही अभ्यासकाला त्या त्या समाजाचा देशीपणा पवित्र समजावा लागतो. त्यामुळे दोन संस्कृतींमध्ये उच्चनीच असाही भेद करता येत नाही.*

*राल्फ लिंटन ह्या मानववंशशास्त्रज्ञाच्या मते देशीवाद हा संस्कृतिसंपर्काचा परिणाम म्हणून उद्भवतो. जेव्हा एखाद्या संस्कृतीचे अस्तित्व दुसऱ्या प्रबळ संस्कृतीच्या आक्रमक द्रष्टेपणामुळे धोक्यात येते, तेव्हा दडपलेल्या समाजात देशीयतेची जाणीव निरनिराळ्या स्वरुपांमध्ये उद्भवते हे लिंटनने सिद्ध केले आहे. एकोणिसाव्या शतकात भारतीयांची अशी स्थिती होती, त्यामुळे एकामागून एक देशीवादी चळवळी निर्माण होत गेल्या. १८५७ चे बंड, ठिकठिकाणचे देशभरचे उठाव, शेतकऱ्यांचे बंड, त्याचबरोबर जमशेटजी टाटा, ज्योतिराव फुले इत्यादी अनेक देशीवादी पुढाऱ्यांनी राजकारणापासून तर भाषाशुद्धीपर्यंत ज्या अनेक देशीवादी चळवळी उभ्या केल्या, त्या सर्वांच्या पायाशी देशी संरचनेचे भान व्यक्त करणे हेच सूत्र दिसून येते. ह्यातले शेवटचे देदीप्यमान उदाहरण म्हणजे महात्मा गांधींचा अहिंसावादी स्वातंत्र्यलढा. सारांश, देशीवाद केवळ एकाच समूहापुरता विभक्त स्वरूपात पाहता येत नाही, कारण एक सांस्कृतिक घटना होण्यासाठी देशीवादाला आपल्या प्रदेशाबाहेरील अन्य संस्कृतींच्या अस्तित्वाची जाणीव असावीच लागते. देशीपणाच्या स्वयंपूर्णतेचे देशीवाद हे बाह्यवर्ती रूप आहे. कारण देशीवादाला असे दबाव आणणाऱ्या परसंस्कृतीचे संदर्भ लागू होतात. देशीपणाला मात्र स्वतःपुरतेच संदर्भ असतात."*

नेमाडेंनी वर्णन केलेले परिणाम हे वैश्य जाणिवेने घडवून आणलेले परिवर्तन असून दलित जाणीवेबरोबर ते वाढत जाणे अटळ आहे. ह्या परिवर्तनाला सामोरे जाण्याऐवजी नेमाडे देशीयतेचा पुरस्कार करून घड्याळाचे काटे उलट फिरवत आहेत. पण नेमाडेंच्या दुर्दैवाने इथला बहुसंख्यांक समाज त्यांच्या बाजूने नाही. त्याने हे परिवर्तन स्वीकारायला सुरुवात केली आहे. आपले नालायक राज्यकर्ते क्षत्रिय जाणिवेच्या प्रभावाखाली जनता रहावी म्हणून अधूनमधून देशी तत्त्वाच्या हाकाऱ्या देत फिरतात व जनता त्यांना बळी पडते. हे लोक स्वतःच्या मुलांना इंग्लिश मिडीयममध्ये घालणार, त्याला वैश्य जाणिवेचे बाळकडू लहानपणापासूनच देणार आणि बहुजनांना मराठी भाषेत शिका म्हणून उपदेश करणार. आज जगातील विज्ञानाचे ज्ञान हे इंग्रजी भाषेत आहे ही एक परखड वस्तुस्थिती आहे. हे लोक त्याच्या साहाय्याने इथली सर्व उत्पादनाची साधने, शासनव्यवस्था आपल्या ताब्यात ठेवणार आणि जनतेला देशी व्हा म्हणत राज्य करणार.

ह्या देशात जे उच्चवर्णीयांचे वर्चस्व आहे ते सर्व लोक वैश्य शिक्षित नाहीत म्हणून. जर सर्वच जनता वैज्ञानिक वैश्य जाणिवेने भारावली जाईल तर ह्या आंग्लशिक्षितांच्या वर्चस्वाला आपोआप सुरुंग लागेल. आपल्या देशातील प्रश्न हे देशीयतेच्या अभावातून निर्माण झालेले नसून वैश्य जाणिवेच्या वैज्ञानिक दृष्टीच्या अभावातून निर्माण झालेले आहेत. आपली बेशिस्त, आपला आळस झटकून जोपर्यंत ही वैश्य व दलित जाणीव आपण तळागाळापर्यंत नेत नाही तोपर्यंत ह्या

देशास भवितव्य नाही. परक्या संस्कृतीचे दबाव किंवा गुलामगिरी हे रोग नव्हेत, तर ती रोगाची लक्षणे होती. वैश्य जाणिवेकडे कायम पाठ फिरवून बसलेल्या सर्वच देशांच्या कपाळी ही रोगाची लक्षणे प्रकट होतातच. ती गुलाम बनतातच. नेमाडेंना ह्या देशाचे रोग नीट कळलेले दिसत नाहीत. वैज्ञानिक जाणीव तुम्हाला अवकाशाचे प्रखर भान ठेवायला शिकवते. किंबहुना संदर्भ चौकट ही एक वैज्ञानिक संकल्पना आहे. भारतात वैश्य जाणीव नीट न रुजल्यानेच अवकाशाचे निकराचे भान आपणाला कधीच आले नाही. परिणामी आपण केवळ बिनडोक उसनवारी करून आपली मॉडेल्स तयार केली. ती फेल जाणं अटळ होती, तशी ती गेली. आपण देशी घटकांचा नीट विचार केला नाही. याचे कारण देशीयतेचा अभाव नव्हता तर आपण पुरेसे आंतरराष्ट्रीय नव्हतो. आपण जर आपले अवकाशाचे आकलन आंतरराष्ट्रीय ठेवले असते तर नेमके काय आयात करायचे, काय निर्यात करायचे याचे प्रखर भान आपणाला मिळाले असते आणि आज आपण जपानबरोबर एक आंतरराष्ट्रीय शक्ती म्हणून उदयाला आलो असतो. नेहरूंचे आंतरराष्ट्रीय भान हे त्यांची अक्कल दाखवत नाही तर त्यांच्या अकलेची दिवाळखोरी दाखवते. असो.

केवळ मानववंशशास्त्रज्ञांनाच नव्हे तर मानव्य शाखेतील कोणत्याही अभ्यासकाला त्या त्या समाजाचा अभ्यास करताना त्या त्या समाजाच्या अवकाशाचे भान ठेवावेच लागते. त्याला पवित्र समजणे ही ब्राह्मण संकल्पना झाली. तिची काही आवश्यकता नाही. मात्र पूर्वग्रहदूषित दृष्टीने न पाहता वैज्ञानिक दृष्टीने पाहणे ही मात्र त्या अभ्यासाची अट असते. त्यासाठी उच्च-नीचतेच्या सर्व संकल्पना फेकून द्याव्या लागतात. मात्र त्या त्या संस्कृतीबाबत तटस्थ निरीक्षणे नोंदवावीच लागतात. वारल्यांची चित्रकला आणि अजंठा-वेरुळची चित्रकला ह्यामध्ये अंजिठ्याची चित्रकला विकसित आहे हे त्याला नोंदवावेच लागते. मराठी समाजाचा अभ्यास करताना वाङ्मयासंदर्भात नेमाडेंची कादंबरी ही फडक्यांच्या कादंबऱ्यांपेक्षा विकसित आहे हे नोंदवावेच लागते. फरक अटळ असतो आणि तो नोंदवावाच लागतो. दलित आत्मकथने नेमाडेंच्या दृष्टिकोनातून देशीयता पाळत असतील, पण सर्वच आत्मकथनात देशीयता आहे म्हणून सर्वच श्रेष्ठ असे नेमाडेंना तरी म्हणता येईल का ? किंवा इंग्रजीची रोमँटिक कविता, मराठीची रोमँटिक कविता, दोन्हीही श्रेष्ठ म्हणता येईल का ? दोन संस्कृतीतही जी अधिक प्रगत आहे ती श्रेष्ठ हे तत्त्व स्वीकारावेच लागते. अलीकडे एअरकंडिशनिंगमध्ये बसून वॉल्डेनच्या काठी विहार करत आदिवासी संस्कृतीही श्रेष्ठ असते असे विचार मांडणारी एक नवी जमात ह्या जगात तयार झालीय. ह्या लोकांना एक गोष्ट सांगावीशी वाटते, की बाबांनो, हे आदिवासीच नव्हे तर आमचे पूर्वजही प्रथम आदिवासीच होते, पण त्यांनी हळुहळू स्वतःचा विकास केला आणि ते इथवर आले. आज ना

उद्या ह्या आदिवासींनाही आमच्यापर्यंत यावेच लागेल. अन्यथा आमच्यातले नालायक लोक (माझा माणसांच्या लायकपणाइतकाच नालायकपणावरही विश्वास आहे.) ह्यांच्यापर्यंत पोहोचतील, त्यांच्या जमिनी हिसकावतील, त्यांचे शोषण करतील आणि नंतर त्यांना शहरात मजूर म्हणून पाठवून देतील. तेव्हा तुमच्या एअरकंडिशनिंगमधला रोमँटिसिझम सोडून द्या आणि हे नालायक त्यांच्यापर्यंत पोहोचण्याआधीच त्यांना आमच्यापर्यंत कसे आणता येईल ते पहा. जर हे नालायक लोक त्यांच्यापर्यंत पोहोचले असतील तर ते शोषण करणार नाहीत याची काळजी घ्या आणि ह्या आदिवासींना वैश्य व दलित जाणिवेच्या मुख्य प्रवाहात आणून सोडा. त्यात तुमचेही भले आहे आणि आदिवासींचेही भले आहे.

भारताने कलर टीव्ही तयार केला नाही तर जपान आपले उत्पादन थांबविणार नाही, ते आपले कलर टीव्ही घेऊन भारतात पोहोचणार, दामदुपटीने विकणार. तेव्हा टीव्हीची आवश्यकताच काय यांसारखे वरकरणी मूलभूत वाटणारे प्रश्न गाढवासारखे विचारणे बंद करा आणि भारतातच टीव्ही तयार करा. त्यातच भारताचे हित आहे. टीव्ही नसलेला भारत पवित्र आणि टीव्ही असलेला जपानही पवित्र हे म्हणणे वरवर छान वाटले तरी ते बिनडोकपणाचे आहे. संस्कृतीत उच्चनीचता नसली तरी प्रगत-अप्रगत हा फरक मात्र निश्चितच आहे. तेव्हा उगाच नेमाडेंसारख्यांच्या नादी लागून रोमँटिक होऊन गहिवर काढण्यात काहीही अर्थ नाही.

भुजंग मेश्राम ह्या गोंड आदिवासी कवीनं म्हटलंय-

*ते आले तेव्हा त्यांच्या हातात बायबल होते,*
*आमच्या हातात जमीन*
*ईश्वराजवळ कोणीच नसते काळे गोरे,*
*चला डोळे मिटून प्रार्थना करू*
*आम्ही खूष होऊन डोळे बंद केले अजाणतेपणाने*
*आणि नंतर उघडले मोठ्या आशेने*
*तर त्यांच्या हातात जमीन होती*
*आमच्या हातात बायबल* *(मूळ कवितेचा भावार्थ)*

जर खरोखरच आदिवासींची जमीन शाबूत रहावी असे वाटत असेल तर बायबल त्यांच्यापर्यंत पोहोचूच देणार नाही अशी भूमिका घेण्यात अर्थ नाही. ते पोहोचणारच. तेव्हा ह्यावर उपाय एकच, समाजातील दलित जाणिवेच्या लोकांनी त्यांच्यापर्यंत पोहोचून त्यांना स्वतःचे बायबल स्वतःच तयार करायला शिकवणे.

दुसरी प्रबळ संस्कृती एखाद्या संस्कृतीला दडपते तेव्हा तिच्या प्रबळपणाची काही कारणे असतात. भारतातील आक्रमकांनी जे विजय मिळवले ते प्रगत शस्त्रांच्या आधारे. अशा आक्रमकांना हुसकावून लावायचे असेल तर देशीवादाचा काडीचाही उपयोग नसतो. इंग्रजी वसाहतवादाविरुद्ध जी देशी बंडे झाली (विशेषतः १८५७ चे बंड) ती पूर्णपणे देशी असल्यानेच अपयशी झाली. जेव्हा इथल्या लोकांनी आपली देशीयतेची कात टाकून इंग्रजांची वैश्य जाणिव स्वीकारली आणि त्या अनुषंगाने चळवळी उभ्या केल्या तेव्हाच ह्या चळवळी यशस्वी झाल्या. फुले काय किंवा टाटा काय सर्वच प्रतिवैश्य जाणीव निर्माण करण्यात यशस्वी झाले. त्यासाठी त्यांनी इथल्या ब्राह्मणी देशी जाणिवेविरुद्ध बंड केले. म. गांधींच्या अहिंसावादी लढ्यामागच्या विदेशी प्रेरणा सर्वश्रुत आहेत. तेव्हा नेमाडेंनी जे चित्र देशी म्हणून उभे केले आहे ते देशी नाही तर प्रतिवैश्य जाणिवेने भारलेले होते आणि त्याचा अवकाश भारतीय कंडीशनिंगने भारला गेला होता.

अन्य संस्कृतीच्या अस्तित्वाची जाणीव असावी लागते हे नेमाडेंना मान्य आहेच. माझे म्हणणे इतकेच की, ज्याला तुम्ही देशी म्हणता ती संस्कृतीही प्राचीनकाळी जशी होती तशी स्वायत्त अस्तित्वात न राहता वैश्विक संदर्भातच अस्तित्वात येते.

*"देशीयतेचा अतिरेक एखाद्या समाजाला आत्मकेंद्रित करून ऱ्हासशील करू शकतो, हे आपण मागे अंतर्जननासंबंधीच्या चर्चेत उल्लेखले. जगातल्या इतर समाजांपासून विभक्त राहण्याची प्रवृत्ती त्यामुळे आपोआपच बळावते. एक प्रकारचा वंशाभिमान आणि आत्मसंतुष्ट जीवनव्यवहार अशा समाजात वाढतात. साहजिकच अशा संस्कृती परकीय आक्रमणात नष्ट होण्याची भीती असते. अल्-बिरुणीने इसवी सनाच्या दहाव्या शतकाच्या आधी अस्तित्वात असलेल्या ब्राह्मणकेंद्री हिंदू समाजात असा देशीयतेचा अतिरेक अतिशय स्पष्टपणे वर्णिलेला आहे. तथापि हिंदुस्थानला आपला देश मानून निर्माण झालेला उदारमतवादी मुलसमान वर्ग आणि महानुभाव-वारकरी अशा ब्राह्मण्यविरोधी संप्रदायांनी देशभर उभारलेल्या आत्मशुद्धीपर देशीवादी चळवळींनी हिंदुस्थानातील समाजाचा पाया पुन्हा नव्याने घालून सर्वनाश चुकविला. तथापि हा समाज पुन्हा अठराव्या शतकापर्यंत देशीपणाच्या अतिरेकाने बुरसटला आणि ज्ञानाधिष्ठित पाश्चात्त्य संस्कृतीसमोर त्याचा टिकाव लागला नाही. परसंस्कृतीच्या संपर्कात राहून नवनवे ज्ञान देशी संस्कृतीत रुजविण्याची क्रिया एकोणिसाव्या शतकानंतर पुन्हा सुरू झाली. ती अजूनही कमीअधिक प्रमाणात चालू आहे."*

खुद्द नेमाडेंनीच इथे देशीवादामुळे झालेले नुकसान सांगितले ते बरे झाले. मात्र उदारमतवादी मुलसलमान वर्ग व महानुभाव वारकरी चळवळीने ह्या देशाचे फार भले केलेले नाही हे मात्र आवर्जून

सांगावेसे वाटते. ह्या मूलतः ब्राह्मणी जाणिवेला शरण गेलेल्या चळवळी होत्या आणि त्यांनी ब्राह्मणी जाणिवेचे समान वाटप मागितले तेही केवळ धार्मिक ॲबस्ट्रॅक्ट बाबतीत. असल्या ॲबस्ट्रॅक्ट गोष्टीमुळे समाज फारसा सुधारत नसतो हेच ह्या चळवळींनी सिद्ध केले. कृष्णाच्या जागी विठ्ठल, गीतेच्या जागी ज्ञानेश्वरी, ब्राह्मणाबरोबर उलेमा आले म्हणजे फार क्रांती झाली हा भाबडा गैरसमज आपण जितक्या लवकर फेकू तितके बरे. साहित्यिक लोकांना फारशी कामे असत नाहीत म्हणून फावल्या वेळेचा उपयोग म्हणून त्यांनी संत कामगिरीविषयी गहिवरून बोलावे, अन्यथा जी चळवळ विठ्ठलाच्या मंदिरात चोखामेळ्याला प्रवेशसुद्धा मिळवून देऊ शकत नाही, तिच्या यशाविषयी फाजिल फुशारक्या मारू नयेत हे उत्तम. कविता म्हणून अभंग थोर आहेत हे मात्र मान्य करावे.

भारत हा मुळातच आत्मकेंद्रित डबक्यात डुंबणाऱ्या लोकांचा देश आहे. वेद न मानणारी उपनिषदे, महावीर आणि बुद्ध ह्यांचा वारसा ज्या दिवशी ह्या देशाने टाकला त्याच दिवशी हा देश रसातळाला जाण्यास प्रारंभ झाला. समुद्रपर्यटनाची घातली गेलेली बंदी ही त्याची शेवटची अवस्था होती. नेमाडेंसारख्या लोकांना सिंधुबंदी पुन्हा आणायची नसेल तर देशीवाद त्यांनी फेकून द्यावा हे उत्तम. हा देश नको तितका देशी राहिल्यानेच त्याचा सत्यानाश झालाय. आता कुठे बापडा जरा आंतरराष्ट्रीय होऊ घातलाय, तर नेमाडेंसारख्या सोवळ्या लोकांनी पुन्हा एकदा देशीवादाचे डबके महान असल्याचा डांगोरा पिटायला चालू केलाय. ज्या लोकांनी हजार वर्षे केवळ विटाळच पाळलाय त्यांना हे सर्व अपील झाले तर त्यात आश्चर्य वाटण्याचे कारणच काय ?

*"देशीपणा हा अशा भावना, जाणिवा, विचार, प्रबोधन आणि स्मृती यांच्या पुंजाला आवाहन करतो, जो विशिष्ट भूप्रदेशाच्या साहचर्यानेच वाढत आलेला असतो. त्यामुळे देशीपणाच्या जाणिवेत भावनाप्रधान काव्यात्मकता अधिक असते, तर विवेकशीलता त्या मानाने कमी असते. परंपराभिमुखता जास्त आणि आधुनिकता कमी असते. तसेच तिचे तोंड भविष्यकाळापेक्षा भूतकाळाकडे जास्त वळलेले असते. देशीपणा हा मागच्या व पुढच्या सबंध समूहगणाचा प्रतिसाद असतो. सबंध समूहाच्या वंशाची ती जीवनशैली असते. समाजाची सामूहिक चिंतनशक्ती आणि भावशक्ती देशीपणात प्रकट होते. स्थूलमानाने पाहता देशीपणाचे तत्त्व गतिशील न ठरता स्थितिशीलतेच्या जवळ जाणारे वाटते.*

*आणखी महत्त्वाची गोष्ट म्हणजे, सनातनी प्रतिगामी वृत्तींशी हातमिळवणी करण्याकडे देशीयतेचा कल असतो हे जितके खरे, तितकेच हेही खरे की, सक्षम देशी व्यवस्थांची झीज घडवून आणणाऱ्या परकीय प्रवृत्तींना यशस्वी रीतीने फेकून देण्याचे देशीयता हे एकमेव अस्त्र दडपलेल्या समाजाच्या हातात असते. हिंदुस्थानच्या संदर्भात असे म्हणता येईल की, प्रदीर्घ*

*आणि समृद्ध इतिहास असलेल्या आपल्या भूतकाळातून नेहमीच प्रभावी शक्ती प्राप्त होण्याची शक्यता असते. महात्मा गांधींची आध्यात्मिकता किंवा आंबेडकरांचे बौद्ध धर्माचे पुनरुज्जीवन अशा देशीयतेच्या प्रतिभाशाली वापराची उदाहरणे कोणत्याही तथाकथित पुरोगामी आंतरराष्ट्रीय तत्त्वांइतकीच आधुनिक भारतीय संस्कृतीला उपकारक ठरली आहेत."*

देशीपणा हा भूतकाळात रमतो हाच तर त्याचा मुख्य दोष आहे. भावना, जाणिवा, विचार, प्रबोधन आणि स्मृती यांच्या पुंजाला आवाहन करणे हा तर सर्वच साहित्याचा विशेष आहे. मात्र विशिष्ट भूप्रदेशाशी साहित्याला निगडित करणे म्हणजे त्याला मर्यादित करणे होय. त्याऐवजी त्या त्या पात्राशी, त्यांच्या त्यांच्या अवकाशाशी आणि त्या त्या अवकाशाने त्या त्या पात्रांच्या केलेल्या कंडीशनिंगशी निगडित राहणे हे साहित्याचे मुख्य मर्म आहे. भावनाप्रधान काव्यात्मकता आणि विवेकशीलता यांचे साहचर्य तिथे नांदते. हे कमी, ते जास्त असा देशीवादी फरक साहित्याला परवडणारा नाही. विवेकशीलता ही वैश्य जाणिवेने अधिक विकसित केली. भावनाप्रधान काव्यात्मकता हा ब्राह्मण जाणिवेचा आणि क्षत्रिय जाणिवेचा मुख्य विशेष होता; पण नंतरच्या वैज्ञानिक शोधांनी निर्माण केलेल्या आधुनिक वैश्य जाणिवेने व दलित जाणिवेने विवेकशीलतेलाही ह्या काव्यात्मतेच्या जवळ आणून उभे केले. ब्राह्मण जाणिवा आणि क्षत्रिय जाणिवा ह्या परंपराभिमुख होत्या तर वैश्य जाणीव वर्तमानाभिमुख व दलित जाणीव भविष्याभिमुख आहेत. त्यांना समूहापेक्षा व्यक्ती महत्त्वाची वाटते. व्यक्ती आधी आणि समाज नंतर असा तिचा क्रम आहे. मार्क्सच्या वैश्य जाणिवेने समाज आधी आणि व्यक्ती नंतर असा परंपरागत क्रम कायम ठेवला म्हणूनच ती अपयशी ठरली. नवीन दलित जाणिवेला हा क्रम पुन्हा नव्याने मांडावा लागेल आणि वैश्य जाणिवेशी एकाचवेळी हातात हात घालून काम करता करता तिच्यावर नियंत्रण ठेवावे लागेल. मात्र हे करताना देशीवादासारख्या मागासलेल्या चळवळीही फेकून द्याव्या लागतील. भूतकाळाकडे सतत.बघणे म्हणजे भविष्याची हत्या करून त्याला वर्तमानात पुरत जाणे होय.

गेली बाराशे वर्षे आपण हा प्रयोग अतिशय प्रभावीपणे पार पाडलाय. त्याचे परिणाम आपण भोगतो आहोत. तेव्हा झाला तेवढा देशी तमाशा आता पुरे झाला. आता नव्या संदर्भात नव्या नाटकाची मांडणी आपण करू. त्यासाठी लागणारी प्रतिभा आपणाजवळ आहे. आपल्या बापजाद्यांपेक्षा आपल्याला जास्त अक्कल आहे ह्यावर आपण विश्वास ठेवू आणि कामाला लागू. ह्या देशाला म्हातारपणाचे कौतुक फार म्हणून नामदेव ढसाळपेक्षा तुकारामाची चर्चा इथे जास्त होते. 'एकूण कविते'पेक्षा समग्र एकनाथ महत्त्वाचे ठरतात. हे जुन्यांचे लाड फार झाले. सतत परंपरेत घुसणे आपण बंद केले तर फार बरे होईल. चित्रे, नेमाडे यांचे यश त्यांनी परंपरेचे भान

राखले म्हणून मिळालेले नाही तर त्यांच्या आधुनिकतेशी नाळा अधिक घट्ट होत्या म्हणून त्यांना मिळालेले आहे. ज्या क्षणी नेमाडेंना परंपरा चावली त्या क्षणापासून नेमाडेंचे साहित्य ढासळू लागले. मेलडीतल्या कविता आणि मेलडीनंतरच्या कविता यांच्या दर्जातला फरक हा ह्या गोष्टीचा उघड उघड साक्षी आहे. चित्रेंनी तात्त्विक पातळीवर देशीवादाचा कितीही पुरस्कार केला तरी प्रत्यक्षात त्यांच्या साहित्यात त्यांनी आंतरराष्ट्रीयवाद कधीच सोडला नाही. म्हणूनच त्यांचे साहित्य उत्तरोत्तर बहरतच गेलेले दिसते. तेव्हा देशीवादाचा परंपरेचा आग्रह चुकीचा आहे. ह्याचा अर्थ परंपरेपासून पाठ फिरवा असा नाही. तुमच्या अवकाशाशी कंडीशनिंगशी जेवढी आणि जशी निगडित परंपरा आहे तिचे सखोल आकलन तुम्हाला असलेच पाहिजे. मात्र ह्या परंपरेचा विचार भविष्याच्या संदर्भातच आणि वर्तमानाच्या शोधातूनच व्हायला हवा. किंबहुना तुमच्या फांद्या जेवढ्या विस्ताराल तितकी तुमची मुळे आपोआपच खोल जातात, हे मागे सांगितले आहेच. तेव्हा आंतरराष्ट्रीय व्हा, आपोआपच परंपरेची आणि स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाची मुळे शोधण्याची गरज निर्माण होईल आणि ही गरज अस्सल असेल.

फार प्राचीन काळापासून ह्या जगात जे काही गैरसमज आहेत त्यांतील एक म्हणजे जीवनशैली समूहामुळे विकसित होते. सर्व जगाचा आणि जगातील समाजांचा इतिहास ह्या विरोधात जात असूनही पुनः पुन्हा हे मत मांडण्यात येते. रोजच्या वस्तूंकडे नीट पाहिले तर एक गोष्ट सहज लक्षात येईल, ती म्हणजे ह्यातील प्रत्येक निर्मिती ही व्यक्तीची निर्मिती आहे. ह्या निर्मितीच्या प्रतिकृती तयार करण्याचे काम समाज करत असतो. अर्थात हे काम करून समाज काही त्या व्यक्तीवर उपकार करत नसतो, तर त्याची निर्मिती समाजाला उपयुक्त वाटते म्हणून ती निर्मिती समाज जतन करतो. त्यामुळे समाज जो काही पुढे जातो तो ह्या मूठभर प्रतिभावंतांमुळेच, पण समाजात बहुसंख्य लोक हे अनुकृतिशील असल्याने ते ह्या निर्मितीवर समाजाचा हक्क सांगत राहतात आणि समाजाविना हे संशोधन अशक्य होते.ह्याच गोष्टीवर एकांगी भर देऊन समाज किंवा समूहच जीवनशैली विकसित करीत असल्याचा दावा मांडत राहतात. वास्तविक त्या प्रतिभावंतांच्या प्रयत्नांवर पाणी पाडणारे नतद्रष्ट लोक हेच असतात. समाज अनेकदा त्यांच्या हयातीत त्यांना दूषणेच देत असतो, पण मेल्यावर पुतळेही उभे करतो. ह्या हालअपेष्टा सोसणाऱ्या लोकांमुळेच जीवनशैली विकसित होते, वाढीस लागते. भारतात अशा व्यक्तींचा दुष्काळ असल्याने आणि व्यक्तिगत कर्तृत्वावर इथल्या लोकांचा विश्वास नसल्यानेच आज ह्या देशात काहीही धड होताना दिसत नाही. किंबहुना 'गोची' जिथे जाईल तिथे गोची करणे हा आमचा मोटो आहे आणि ह्या मूर्ख सिद्धांताला पाठबळ पुरवण्याचे काम तथाकथित मार्क्सवादी आणि देशीवादी विचारवंत

करीत असतात. समूहाच्या जीवनशैलीचे सिद्धांत हे मांडत राहतात. देशीपणा काय किंवा मार्क्सवादी काय स्थितिशीलतेकडे झुकतात. कारण त्यांचा व्यक्तिगत कर्तृत्वावर विश्वास नसतो. या स्थितिशीलतेवर आक्रमण करणारी किंवा तिला आतून गदागदा हलविणारी नवीन मूल्ये येऊ लागली की हीच माणसे 'इस्लाम खतरे में', 'डंकेल रोको, देश बचाओ', 'देशीवाद झिंदाबाद' ह्यासारख्या घोषणा द्यायला लागतात. त्यासाठी लागणारा आधार परंपरेतच सापडू शकत असल्याने सनातन प्रतिगामी वृत्तीशी हातमिळवणी करणे अटळ ठरते. मग हे लोक पुस्तकी बोलायला लागतात. म. गांधींची आध्यात्मिकता व बुद्धाची शिकवण ही सर्व जगासाठी होती (त्यांनी कुठेही असं म्हटलेलं नाही की अहिंसा वगैरे फक्त देशी आहे) हे सोयिस्कररित्या विसरून त्यांना देशीवादी ठरविण्याचे प्रयत्न करतात. बाबासाहेबांना बुद्ध धर्म अपील झाला त्याचे कारण तो देशी होता म्हणून नव्हे, तर तो अधिक मानवतावादी होता म्हणून हे सांगणे सोयिस्कररित्या टाळतात. वास्तविक ह्या शतकात विवेकानंद, गांधी, आंबेडकर यांचे जे जे आंतरराष्ट्रीय होते तेवढेच भारतीय संस्कृतीला उपकारक ठरल्याचे दिसते. गांधींचे 'गाय ही गोमाता आहे' किंवा 'लोकांची पापे वाढली म्हणून भूकंप झाला' किंवा 'भारतात लोक ब्रह्मचर्य पाळू शकतात म्हणून संततिप्रतिबंधक साधने नकोत' ह्यासारखे देशी आग्रह ह्या देशाला किती महागात पडले ते आपण पाहातोच आहोत.

*''परंपरा आणि आधुनिकता यांच्यातील द्वंद्व चिरंतन चालू ठेवणे समाजाच्या जिवंतपणाचे लक्षण असते. असा झगडा परिणामी देशीयतेशी संबंधित असतो. आधुनिक भारतीय समाजाला परंपरा आणि आधुनिकता, देशीपणा आणि आंतरराष्ट्रीयता, धर्म आणि विज्ञान, ऐहिक आणि पारलौकिक अशा अनेक द्विध्रुवात्मक क्षेत्रांमधला समताण अजून सापडलेला नाही. मागे वर्णिलेली इंग्रजी साम्राज्यप्रणीत आंतरराष्ट्रीयता आपल्यावर स्वतंत्र झाल्या झाल्या लादली गेल्यामुळे आपल्याला असा समताण प्रस्थापित करणे अधिक कठीण झाले आहे. ह्यामुळे आपली जगण्याची शैली उघडपणेच बिघडली आहे. उदाहरणार्थ, आपल्या देशी पोशाखशैलीतला पगडी, पागोटे, फेटा, पटका, मुंडासे, टोपी, रुमाल इत्यादी. सर्वांत महत्त्वाचा, उपयुक्त आणि सौंदर्यशील ऊर्ध्वभाग केवळ अडाणी, पारंपरिक आणि देशी संस्कृतीतील लोकांनीच टिकवून ठेवला. पाश्चात्त्य वेषभूषेचे अनुकरण करणाऱ्या पुरोगामी आंतरराष्ट्रीय जीवनपद्धतीत जगणाऱ्या शिक्षितांनी मात्र हा सर्वांत सौंदर्यशील जुळणभाग (Syntagm) परसंस्कृतीच्या दबावामुळे लज्जास्पद ठरवला. आपल्या काळ्यासावळ्या बदामी हिंदुत्वतेच्या रंगाच्या तुलनेत परकी श्वेत त्वचा सुंदर मानली गेली. ह्या आर्योत्तर वर्णवर्चस्वाला श्वेत ब्रिटिश राज्यकर्त्यांमुळे पुन्हा विसाव्या शतकात उधाण आले. आपल्या*

*थोर पारंपरिक कला, विशेषतः लोककला, नृत्य, संगीत, शिल्प, चित्र, स्थापत्य आणि खरे तर सर्वच हस्तकौशल्य ग्रामीण शूद्रांशी किंवा हलक्या जातींशी जोडले गेले. परदेशातून ह्या अनार्यांच्या देशात आलेल्या थोर आर्यगोत्रांचे शुद्धबीज म्हणवून घेण्याची आकांक्षा इतक्या थराला गेली की, महाराष्ट्रीय लोकांचा वांशिक पाया द्रविडीच आहे हे सुद्धा आपले विद्वान विसरून गेले. आर्य हा या देशात कोणत्याच समूहाचा शुद्ध वांशिक घटक असू शकत नाही, हेही बहुतेक उच्चवर्णीयांना मान्य नसावे.*

परंपरा आणि आधुनिकता यांच्यातील द्वंद्व चिरंतन चालू ठेवणे हे समाजाच्या जिवंतपणाचे लक्षण नसते, तर ह्या द्वंद्वात आधुनिकता विजयी होत राहणे हे समाजाच्या जिवंतपणाचे लक्षण असते. गेली अकराशे वर्षे भारतात हे द्वंद्व अस्तित्वात होते; पण आधुनिकता विकसित होऊन कधीच विजयी न झाल्याने हा समाज मृतच राहिला. इथली परिवर्तने वरवरचीच राहिली. भारताला अनेक द्विध्रुवात्मक क्षेत्रातला समताण सापडलेला नाही; कारण भारत कधीच पुरेसा आंतरराष्ट्रीय झाला नाही. इंग्रजी साम्राज्यामध्ये अनेक द्विध्रुवात्मक ताण भारतात आले. अन्यथा हा देश ब्राह्मण जाणिवेच्या एकाच ध्रुवाखाली नांदत होता. ह्यामुळे जगण्याची शैली बिघडली नाही तर, कुजलेली जगण्याची शैली, ही कुजलीय हे प्रथमच आमच्या लोकांच्या लक्षात आले. तोवर कुजण्याचा वास येत असूनही आमचे लोक नाकात बोळे घालून हिंडत होते. इंग्रजांच्या आगमनानंतर हे चित्र बदलले. त्यात आपल्या अन्न, वस्त्र, निवारा, आरोग्य, शिक्षण ह्या मूलभूत गरजा भागवणाऱ्या उत्पादन पद्धती, तंत्र बदलले. त्यामुळे ह्या गोष्टींकडे पाहण्याचा आमचा दृष्टिकोनही बदलला. केवळ भारतातच नव्हे तर जगभर वैश्य जाणिवेमुळे पारंपरिक पोशाखाच्या शैली बदलल्या. फक्त बाकीचे देश हा बदल सहज स्वीकारतात, भारतात मात्र नेमाडेंसारखे लोक स्वतः शर्ट-पॅण्ट घालून पगडी, पागोटे, फेटा, पटका, मुंडासे, टोपी, रुमाल वगैरे सौंदर्यशील ऊर्ध्वभाग नाहीसे झाल्याबद्दल शोक व्यक्त करतात. जग आणि भारत ह्यांच्यात ह्याबाबत फरक पडला तो वैज्ञानिक दृष्टिकोनाचा. हवामानानुसार पोशाख करणे हा एक जगभरचा आंतरराष्ट्रीय वैज्ञानिक सिद्धांत तर कपडे व त्यांची इस्त्री प्रदीर्घ काळ टिकणे ही आधुनिक संस्कृतीची गरज ! भारतीयांनी ह्या दोन्हीचा तोल सांभाळून आपल्या पोशाखाच्या शैली विकसित करायला हव्या होत्या; पण भारतीयांजवळ प्रगल्भ वैश्य जाणीव नसल्याने त्यांनी ह्याबाबतही आळशीपणा दाखवला. नवीन कपडे तयार करण्याऐवजी युरोपियनांचे कपडे सहीसही उचलले. सूतकताईचे खादी कपडे वापरण्यासारखे अत्यंत मूर्ख देशी गांधीवादी पर्याय आम्ही स्वीकारले किंवा गोंजारले (गांधीजींचा हा पर्याय स्वीकारायचे ठरवले तर माणसाचे एक षष्ठांश आयुष्य कपडे तयार करण्यात जाईल ही साधी गोष्ट

आम्ही लक्षात घेतली नाही.) ह्याचा प्रत्यक्ष व्यवहारात उपयोग नव्हता. साहजिकच हा देशी पर्याय इथल्या लोकांनी फेकला. शिवाय ह्या वापरात रोजच्या रोज इस्त्री करण्याची कटकट होती तसेच आकर्षक डिझाईन्सची व्हरायटी नव्हती. आम्ही ह्यावर उपाय म्हणून कडक इस्त्री टिकणारे, टिकाऊ, आकर्षक डिझाईन्सचे नवीन नवीन प्रकारचे कपडे तयार करायला हवे होते. सल्वार कमीजसारखे आकर्षक पर्याय शोधायला हवे होते. आपल्या पटक्या आणि फेट्यातून नवीन पद्धतीची हॅट विकसित करायला हवी होती. ह्यातील काहीही न करता आम्ही केवळ इंग्रजांच्या नावाने बोंबा मारल्या (ह्याबाबतीत आपल्या बायकांनी मात्र अधिक शहाणपणा दाखवला. त्यांनी आपल्या चोळीवरून सुंदर रीतीने नवीन ब्लाऊज किंवा नवीन पद्धतींच्या चोळ्या विकसित केल्या. साड्यांत नवीन पर्याय शोधले. पंजाबी ड्रेससारखे पर्याय देशभर नेले. अन्न, निवारा, शिक्षण, आरोग्य ह्या बाबतीतही भारतीय बायकांनी जी जीवनशैली विकसित केली ती निश्चितच पुरुषांपेक्षा श्रेष्ठ आहे. आरोग्याबाबतीत कुठे देशी पर्याय निवडायचा आणि कुठे विदेशी पर्याय कवटाळायचा ह्याबबतीत पुरुषांपेक्षा दसपट श्रेष्ठ असा विवेक बायकांनी दाखवला. पुरुषांनी ह्याबाबतीत केवळ पुस्तकी चर्चा केल्या. आपल्या बायका मात्र ह्याबाबतीत खऱ्या अर्थाने नवीन संस्कृती जगल्या. दुर्दैवाने त्यांना इथल्या सामाजिक परिस्थितीमुळे ब्राह्मण व क्षत्रिय जाणिवेच्या दबावाखाली काम करावे लागले. अन्यथा विसाव्या शतकाच्या इतिहासात पुरुषांपेक्षा बायकांनीच जास्त चांगली अक्कल दाखवलेली दिसते. संस्कृतीचे असली संवर्धन बायकाच करतात हे बायकांनी भारतात तरी निर्विवादपणे सिद्ध केले. दुर्दैवाने आपले इतिहास हे पुरुषी दृष्टिकोनातून लिहिले जात असल्याने पुरुषांनी केलेल्या फालतू लढाया ह्या उत्तम पाकक्रियेपेक्षा महत्त्वाच्या ठरतात. असो.) ह्यानंतरचे त्वचेविषयीचे व त्यानंतरचे विवेचन योग्य आहे. मात्र गौर रंगाचे वर्चस्व हे इंग्रजापूर्वीही अस्तित्वात होते एवढेच इथे पुन्हा सांगावेसे वाटते.

*''त्या त्या भूमीची स्वतःची चिन्हव्यवस्था (हेमिंग्वेच्या शब्दात 'कोड ऑफ द लॅंड') असते, लय असते. हीच नेमकी आपल्या बुद्धिव्यवहारातून प्रकटली नाही तर आपल्या साहित्याच्या उद्योगाला अर्थ नाही. आपल्या निर्णयबुद्धीवरसुद्धा परदेशाच्या (म्हणजे प्रायः पाश्चात्य) विचारांचा अधिकार चालत आलेला स्पष्ट दिसतो. ह्यामुळेच पथेर पांचाली ला प्रथम परदेशात नाव मिळते, नंतरच ती इकडे गाजते ! खरे तर इथल्या सुबुद्ध लोकांना ती आधीच आवडलेली असते, पण तिचा गवगवा होणे हा प्रकार परदेशी कसोटीमुळेच शक्य झाला ! ह्यामुळेच हिंदुस्थानी लोक परदेशातील डिग्री घेण्यासाठी धडपडत असतात. प्र. के. अत्रे, एम. ए., बी. टी., टी. डी. (लंडन) यांच्यापासून आजपर्यंत हा प्रकार चालू आहे. इंग्रजीचा वीट आणणारा वापर आपल्या राष्ट्रीय*

जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत इतका होता की, ह्या प्रकारचा स्वतंत्र अभ्यासलेख होऊ शकतो. इंग्रजीतून कवितासुद्धा आपले विद्वान करू शकतात; त्याहून हास्यास्पद प्रकार म्हणजे काही लेखक आपली पुस्तके इंग्रजीत भाषांतरित करून घेण्याचे नाना खटाटोप करून राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीयसुद्धा होण्याचा ध्यास घेतात. झटपट साहित्यिक बिरुदे मिळविण्याचा हा एक संशयास्पद मार्गच झाला आहे. आता आपल्याला एक गोष्ट मानणे आवश्यक झाले आहे की, आपल्या स्वतःच्या भाषासमूहाबाहेर आपण जे जे भाषिक वर्तन करतो त्याला सामान्य दर्जापलीकडे काही महत्व नसते. इंग्रजी लेखकांची सर्टिफिकिटे आपल्या पुस्तकांवर छापून आंतरराष्ट्रीय झालेल्या इंडो-अँग्लिअन लेखकांचाही स्वतंत्र अभ्यासलेख होऊ शकेल. ''भारतीयांचे इंग्रजी लेखन'' हा ह्या ग्रंथातील निबंध पाहा.. जी. व्ही. देसानी ह्यांच्या 'ऑल अबाऊट एच्. हॅटर' या कादंबरीत दिल्लीच्या रामलीला मैदानावर जत्रेत तंबू ठोकून बसलेले साधू दाखविले आहेत. त्यांनी आपल्या तंबूवर ''ऑल इंडिया साधू'', ''इंटरनॅशनल साधू'' वगैरे अशा पाट्या लटकावल्या आहेत. ह्या साधूंमध्ये आणि आपल्या भाषेबाहेर प्रसिद्ध होऊ पाहणाऱ्या लेखक विद्वान मंडळींमध्ये काही फरक नाही.'

चेअरमन माओ त्से तुंग यांनी १९५५ च्या सुमारास म्हटले होते की, ''जवाहरलाल नेहरूंना हे कळलेले दिसत नाही की, हिंदुस्थान हा आशियाचा भाग आहे, युरोपचा नव्हे !'' हे उद्‌गार गुलामगिरीतून मुक्त झालेल्या आशियाई राष्ट्रांच्या वतीने केलेली देशीयतेची सर्वसाधारण व्याख्याच म्हटली पाहिजे. आपण नेहरूकाळापासून अशीच आंतरराष्ट्रीयता उबवत आणली आहे की, तिच्यातून पश्चिमी राष्ट्रांना हवी असलेली पिल्ले बाहेर पडतात. तिकडच्याच सोयीनुसारच आपली जाण विशाल की संकुचित आहे हे ठरते. हा इंटरनॅशनॅलिझम किसिंजर, वालेसा किंवा गोल्डिंग ह्यांचे पाश्चिमात्य श्रेष्ठत्व नोबेल पुरस्काराद्वारे आपण मानावे ह्यासाठीच आहे. आपल्या गांधी, प्रेमचंद किंवा शिवराम कारंथ यांना मात्र ह्या नोबेल पुरस्कारासाठी कोणीच मानू नये, असेही हीच विशाल आंतरराष्ट्रीयता आपल्याला शिकविते. अजिंठ्यातल्या बुद्धाच्या हातातले पद्म कमी महत्त्वाचे ठरून व्हॅनगॉगचे सूर्यफूल अधिक उल्लेखनीय ठरते.''

प्रत्येक भूमीची चिन्हव्यवस्था पूर्णपणे स्वायत्त असण्याचा कालखंड हा अवकाशयुगात लयाला चालला आहे. भूमिनिष्ठ तत्त्वांचा होत चाललेला ऱ्हास हा विसाव्या शतकाचा एक विशेष म्हणता येईल. हा ऱ्हास आणि वैज्ञानिक चिन्हव्यवस्थेचा वाढत चाललेला आवाका ह्या दोन्ही गोष्टी आधुनिक साहित्यातून प्रकट होणार नसतील तर आपल्या साहित्याच्या उद्योगाला फारसा अर्थ नाही असे म्हणावे लागेल. ह्यानंतरचे नेमाडेंचे मुद्दे बरेचसे खरे आहेत. आपल्यालाही जी आंतरराष्ट्रीय सर्टिफिकेटस् लागतात त्याचे कारण आपण आंतरराष्ट्रीय दर्जाचे आहोत हा आपणाला

विश्वासच नाही. काम्यूच्या आऊटसायडरपेक्षा नेमाडेंची कोसला ही अधिक थोर कादंबरी आहे हे आपण ओरडून सांगणे अत्यंत आवश्यक आहे. पण ते सांगण्यासाठी आपणाला आंतरराष्ट्रीय प्लॅटफॉर्मवर आपली इतर देशांनाही लागू पडेल अशी आंतरराष्ट्रीय चिन्हव्यवस्था घेऊन जावे लागेल. भारतीय साडी नुसती थोर आहे असे म्हणून चालणार नाही, तर जाहिरातीची सर्व आंतरराष्ट्रीय टेक्निक्स वापरून ही भारतीय साडी आंतरराष्ट्रीय दर्जाची बनवून तसे सिद्ध करून व नंतर तसा प्रचार करून तिच्यात अमेरिकन बाईचा बांधादेखील कसा ठसठशीत दिसतो हे पटवून दिले पाहिजे. देशीवादाच्या गप्पा मारून हे होणार नाही. कबड्डी हा खेळ देशी आहे असे तुम्ही म्हणाल तर तो भारतातच राहणार. पण प्रत्यक्षात अमेरिका, इंग्लंडमधील लोकही तो खेळू शकतात आपण त्यांना जाऊन तो शिकवला पाहिजे. त्यासाठी कबड्डी ही भारतीय नाही तर आंतरराष्ट्रीय आहे हे सांगायला पाहिजे. प्रत्यक्षात आपण ह्यातले काहीच करत नाही. फक्त ऑलिम्पिकमध्ये कबड्डी नाही म्हणून रडत बसतो. ह्याने प्रश्न सुटणार नाही. आज जग कुठल्याही नवीन गोष्टीसाठी उत्सुक आहे. फक्त तुम्ही जगाची आंतरराष्ट्रीयता ओळखली पाहिजे. भारतीय तत्त्वज्ञानावर व मानव्यशाखांवर जेवढे पाश्चिमात्यांनी लेखन केले आहे, तेवढे भारतीयांनी केले नाही ही एक वस्तुस्थिती आहे. नेमाडे ह्या गोष्टीकडे सोयीस्कर दुर्लक्ष करतात आणि ते लोक मान्यता देत नाहीत म्हणून बोंब मारतात. प्रत्यक्षात आपल्या साहित्याची लायकी काय ते विचारत नाहीत किंवा आपण भाषांतर व प्रसाराबाबत कमी पडतो हेही ध्यानात घेत नाहीत. शेक्सपियर जगभर पोहचविण्यासाठी ब्रिटिशांनी घेतलेली मेहनत ते लक्षात घेत नाहीत आणि तुकारामाला तिकडे विचारत नाहीत म्हणून त्यांना दोष देतात. वास्तविक तुकाराम जगभर नेण्याची जबाबदारी कुणाची ? त्यांची की तुमची ? त्यासाठी तुम्ही काय केलेत ? तुम्ही साम्राज्ये निर्माण केली नाहीत ह्याची जबाबदारी तुमच्यावर पडते की त्यांच्यावर ? स्वतः काही नीट करावयाचे नाही आणि परदेशी लोकांना शिव्या द्यायच्या ह्याखेरीज तुम्ही काय केलेत ? तुमचे सर्व बौद्ध ग्रंथ तिबेटी आणि चिनी भाषेत गेले, पण तिबेटी आणि चीनचे किती ग्रंथ तुम्ही पाली, अर्धमागधी, संस्कृतमध्ये नीट आणले ? स्वतःच्या देशात गुंतलेला इतका आत्मकेंद्री मनुष्य जगाच्या पाठीवर नसेल. नेमाडेंचा देशीवाद परदेशातून आला असेल पण त्यामागची मनोवृत्ती ह्या देशाच्या नसानसात भिनलीय. विज्ञानाबाबत काडीचीही अक्कल नसलेले पण सर्व विज्ञान वेदात आहे असे सांगणारे मूर्ख लोक ज्या देशात प्रतिष्ठा पावतात त्या देशाचे काय होणार ? असल्या देशात नेमाडेंसारखी देशीवादी मंडळी गाज गाज गाजली तर त्यात आश्चर्य ते काय ? त्यांची नोबेल ही मूल्यमापनाची कसोटी आपण का ठरवतो आहोत ? खुद्द नेमाडे नोबेलचा विचार करतात हे धक्कादायक आहे.

नोबेल हा त्यांचा पुरस्कार आहे ते त्यांच्याच दृष्टीने देणार. तुम्ही त्याला शह कसे देणार ? नोबेल गांधी, प्रेमचंद, कारंथ ह्यांना द्या म्हणून सांगून ? मी विचारतो, आपणच प्रतिनोबेल पारितोषिक निर्माण करून ते जगातील उत्तम लेखकांना का देऊ नये ? अजिंठ्याच्या पद्माची ख्याती आंतरराष्ट्रीय आहे, पण व्हॅनगॉग चे सूर्यफूल उल्लेखनीय ठरते ह्याचे कारण काय ? व्हॅनगॉगची पेंटिंग्ज आज दहा-पंधरा रुपयात मुंबईत सांडलेली दिसतात. तुम्ही अजिंठा-एलोरा अशा रीतीने पोहोचविण्याचा कधी प्रयत्न केलात ? तुमच्या शाळांपैकी किती शाळांच्या सहली अजिंठा-एलोराला गेल्या ? तुम्हा मुलांपर्यंत अजिंठा-एलोरा पोहोचविण्यासाठी काय केलेत ? त्यांनी व्हॅनगॉगचे सूर्यफूल दहा रुपयांत मुंबईपर्यंत उपलब्ध केले, तुम्ही धड तुमच्याच राज्यात अजिंठा-एलोरा नीट पोहोचविला नाहीत. ह्याचे श्रेय कुणाला ? आपल्या नालायकीचे पोवाडे आपण खूप गायले, आता सरळ सत्यांना भिडू या. आपला नालायकपणा कबूल करू या. देशीवादाच्या नव्या बुरख्याखाली लपण्यापेक्षा उघड चेहरा घेऊन जगात वावरू या. ह्यातच ह्या देशाचे कल्याण आहे.

ह्यानंतर नेमाडेंनी ह्या निबंधाचा पुढीलप्रमाणे शेवट केलाय.

*"देशीयतेचे तत्त्व असे सांगते की, आपण निर्माण केलेली प्रमाणके सोडून इतरांच्या प्रमाणकांचा स्वीकार करता कामा नये. कितीही मोठ्या प्रमाणावर बाहेरून उसनवारी केली तरी त्यामुळे देशीपणाला बळकटीच येईल. परंतु ज्या प्रमाणकांवर हा उसनवारीचा सांस्कृतिक व्यवहार चालेल, ती प्रमाणके आपली स्वतःची असली पाहिजेत. जर विशिष्ट प्रकारची आंतरराष्ट्रीयता आपल्याला परवडत नसेल, तर ती झुगारली पाहिजे. देशीपणाचे महत्त्व स्वीकारले की, पहिली जबाबदारी म्हणजे जगभरच्या वावड्या न उडवता प्रथम आपल्या घराजवळची वस्ती, आपला गाव, भाषा, प्रदेश, प्रांत ह्यावर आधी लक्ष केंद्रित करावे. स्वातंत्र्योत्तर काळात आपल्या देशात असे भोंदू विचार, राजकीय पक्ष आणि पंथ महत्त्वाचे ठरले की, जे राष्ट्रीय एकात्मता, भारत जोडो, आंतरभारती, अखिल जग आणि विश्वमानव ह्यांच्या कल्याणाच्या गोष्टीच फक्त करतात. खोट्या सुखद एकतेचा आणि भव्य विशालतेचा प्रयोग राजकीय युक्ती म्हणून प्रबळ सत्ताधारी वर्ग जनतेवर नेहमीच करत असतो.*

*जगातल्या सर्वात प्राचीन जिवंत मानवी संस्कृतीचे सभासद ह्या नात्याने तरी देशीयता हे मानवी अस्तित्वासाठी एक आवश्यक आणि मौलिक तत्त्व म्हणून ह्या पृथ्वीवर प्रस्थापित करायला हिंदुस्थानी लोक सर्वाधिक पात्र आहेत, असे मला वाटते."*

मी मागेच म्हटल्याप्रमाणे प्रमाणके दोन प्रकारची असतात (१) वैयक्तिक प्रमाणके (२) वैज्ञानिक प्रमाणके.

नेमाडे प्रमाणकांची उसनवारी मान्य करतात हे आपले नशीब ! पण ही उसनवारी विज्ञानामुळेच शक्य होते किंवा एखाद्या व्यक्तीची तिच्या कंडीशनिंग (संस्कारण हा पर्यायी शब्द इथे सुचविता येईल, मात्र हा संस्कार बुद्ध तत्त्वज्ञानाशी निगडित आहे.) मधून निर्माण झालेली प्रमाणके दुसऱ्या व्यक्तीला कंडीशनिंगमधील साम्यामुळे उसनी घ्यावीशी वाटतात. ह्या व्यवहारात वैयक्तिकता किंवा वैज्ञानिकता महत्त्वाची ठरते, देशीवाद दुय्यम ठरतो. पूर्वी जगभरच्या वावड्या हा कल्पनाविलास होता. आता तो तसा राहिला नाही. तुमचे सर्व जीवनच विश्वाशी जोडले गेले आहे. रोजच्या जीवनातल्या साध्या चहाची किंमतसुद्धा आता विश्वातील घडामोडींवर अवलंबून असते. पुढाऱ्यांचा भोंदूपणा आणि आंतरराष्ट्रीयता यांचा नेमाडेंनी जोडलेला संबंध चुकीचा वाटतो. देशीवादी लेखक भोंदू निघाले म्हणून देशीवाद कसा काय भोंदू मानता येईल ? आपल्या राजकीय पुढाऱ्यांचा भोंदूपणा आंतरराष्ट्रीय बाबतीतच चालतो असे नाही, तर नेमाडे ज्याला देशीवाद म्हणतात तिथेही चालतो. किंबहुना तिथे तो दुप्पट चालतो. भारतीय संस्कृती, देशी विचारसरणी ह्या गोष्टींचा वापर करून भारतात जेवढे अत्याचार झाले तेवढे कुठेच झाले नसतील. परंपरेचा सर्वाधिक ताणा ह्या देशाने सोसलाय, म्हणूनच ह्या देशातून, ह्यातून वाट काढण्यासाठी विश्वासाठी पसायदान मागणारे महापुरुष इथे पुनः पुन्हा जन्मले. ह्या देशात सर्वाधिक हिंसा होती म्हणूनच अहिंसेचा अधिक प्रचार इथे करावा लागला. इथे धार्मिकतेच्या नावाखाली सर्वाधिक विषमता होती म्हणूनच धार्मिक समतेचे तत्त्वज्ञान मांडणाऱ्या चळवळी इथे सर्वांत जास्त जन्मल्या.

देशीयतेचे फटके सर्वात जास्त सोसून जीर्णशीर्ण झालेल्या या देशाला, जिथले महापुरुष विश्वासाठी पसायदान मागत मागतच इथल्या देशी ब्राह्मणी जातिव्यवस्थेवर, समाजव्यवस्थेवर टाचा घासून घासून मेले, त्या महापुरुषांची परंपरा सांगणाऱ्या ह्या समाजाला जेवढी अस्सल आंतरराष्ट्रीयत्वाची गरज आहे तेवढी कुणालाच नाही. आंतरराष्ट्रीयवादाला सर्वाधिक अपात्र ठरलेली ही सर्वांत प्राचीन संस्कृती ज्या दिवशी हे सत्य ओळखेल तो सुदिन होय. तोपर्यंत ज्ञानेश्वरांचे पसायदान पुस्तकात पडून आहेच.

